# अनुक्रमणिका.

विषय. पृष्ठ.



## भाग २ रा.

माझे

परमपूज्य गुरुवर्य

## रा. रा. बालकृष्ण भाऊ जोशी

ज्यांनीं,

लहानपणीं माझ्या हृदयभूमींत वाचनाभि-
रुचीचें बीज पेरिलें, ज्ञानामृत सिंचनानें
त्यास अंकूर फोडिला, तो अंकूर
फोंफावण्यास हरप्रयत्नें जीवा-
पाड श्रम केले,

त्यांना

त्यांनींच लाविलेला रोपा जो आज अष्ट भाषांच्या
अष्ट शाखांनीं विस्तारला असून, विविध विषयांच्या
पल्लवांनीं गजबजून, वृक्षरूपानें झुलत आहे;

त्याचें हें

पहिलें, छोटें व साधें ग्रंथ-पुष्प
अत्यंत भक्तिभावानें व प्रेमभरानें

## अर्पण

केलें असे.

सरस्वतीमंदिर, वाई
ता. २७।६।१९१६. } शि. ल. आतार.



# हृदय-निवेदन !



महाराष्ट्र वाचकहो, हातीं आपल्या कृतीचा एकादा ग्रंथ घेऊन, आपल्या भेटीस येण्याचा हा माझा पहिलाच प्रसंग. हा प्रसंग आपणां उभयतांस मंगलप्रद व स्नेहवर्धक होवो; आणि वाङ्मयक्षेत्रांत आपल्या भेटी होण्याचे योग असेच वारंवार येवोत अशी मंगल मनकामना प्रगट करून माझ्या प्रस्तुतच्या हृदय-निवेदनास प्रारंभ करितों.

प्रस्तुत पुस्तकांतील पहिला भाग "अमेरिकेच्या व्यवसायोन्नतीचा इतिहास" हा आहे. हा भाग अमेरिकानिवासी माझे मित्र जगन्नाथ खन्ना बी. एस्. सी. ई. ई. यांच्या "अमेरिका-स्थिति दिग्दर्शन ग्रंथ-माला" या मालेंतील पहिलें पुष्प आहे. श्रीयुत खन्ना हे अमेरिकेच्या मोठमोठ्या विश्वविद्यालयांत राहिले आहेत. तेथील लोखंडाच्या मोटमोठ्या कारखान्यांत त्यांनीं काम केलें आहे. तेथील सभांत व समाजांत त्यांनीं पुढाकार घेतला आहे. यामुळें त्यांना अमेरिकेसंबंधीं सर्व प्रकारचें बारीकसारीक सुद्धां ज्ञान झालें आहे. त्या ज्ञानाचा फायदा ते आपल्या मातृभाषेंत ( हिंदींत ) ग्रंथ लिहून आम्हां भारतवासीयांस करून देणार आहेत. त्याकरितां ते एक स्वतंत्र माला गुंफण्याचे कामास प्रवृत्त झाले आहेत ही मोठ्या आनंदाची व अभि[illegible]

नंदनीय गोष्ट आहे. त्यांच्या या माळेचा अनुवाद निर-निराळ्या देशी भाषांत होणार आहे. मराठी वाङ्मयक्षेत्रांत त्यांचे विचार प्रसृत करण्याचें काम मजकडे सोंपविण्यांत आलें असून तें मी मोठ्या आनंदानें स्वीकारलें आहे. त्यां-पैकीं पहिल्या पुष्पाचा हा अनुवाद वाचकांस सादर करीत आहे. तो वाचकांस उपयुक्त, मनोरंजक व ज्ञानप्रद होईल अशी मला आशा आहे.

दुसरा भाग वाचकांस अमेरिकेसंबंधीं विविध प्रकारचें ज्ञान करून देण्याच्या उद्देशानें लिहिला गेला आहे. तो भाग वाचक बंधुभगिनींना विशेष करमणूक करणारा, ज्ञान-दायक व उपयुक्त होईल, यांत मुळींच शंका नाहीं. " गृह-व्यवस्था " या लेखावरून आमच्या प्रीय वाचक-भगिनींना बराच बोध घेतां येईल. " वाशिंग्टन स्टेट व ऑरेगॉन स्टेट " यांवरून तेथील प्रदेशाच्या स्वरूपाची दिशा कळेल. " विद्यार्थीजीवन " यावरून तेथें विद्यार्थी स्वावलंबनाची कास धरून विद्यार्जन कसें करितात तें समजून येईल. ' शिक्षणपद्धति, शाळा वगैरेवरून तेथील शिक्षणाची उप-युक्तता व महत्व यांची जाणीव होईल. याप्रमाणें हा भाग वाचकांस विशेष ज्ञानप्रद व उपयुक्त होणार आहे.

झालें ! निवेदन संपलें ! आतां एकच मोठें व महत्वाचें कार्य राहिलें आहे. तें कार्य ह्मणजे आभार प्रदर्शनाचें होय. प्रस्तुत पुस्तकांतील पहिला भाग श्रीयुत जगन्नाथ ...ना बी. एस्. सी. ई. ई. यांच्या पुस्तकाचा अनुवाद

 

आहे. ते अमेरिकेंत राहून तेथील स्थितीचें यथातथ्य ज्ञान आह्मां भारतवासीयांस करून देण्यास प्रवृत्त झाले आहेत, त्याबद्दल सर्व भारत त्यांचें ऋणी आहे; परंतु त्यांनीं प्रस्तुत लेखकांस आपलें पुस्तक पाठवून त्याचा अनुवाद करण्यास आज्ञा केली. याबद्दल तो त्यांचा अत्यंत आभारी आहे. तसेंच या पुस्तकाचा दुसरा भाग लिहिण्यास अमेरिकेंतील माझे भारतीय बंधु गुरुदत्तकुमार, वीरसेनसिंह, पंडित केशवशास्त्री एम्. डी., विनयकुमार सरकार एम्. ए., मिसेज सेंट निहालसिंह वगैरेंच्या कृतींचे व अमेरिकेंतून जाऊन आलेले माझे मित्र व भारतराष्ट्राची रात्रंदिवस चिंता वाहणारे जलाल देशभक्त श्रीयुत सत्यदेव यांच्या ग्रंथांचें साह्य झालें आहे त्याबद्दल प्रस्तुत लेखक या सर्व लेखकांचा व त्यांच्या ग्रंथ प्रकाशकांचा अत्यंत ऋणी आहे. पुस्तक छापलें जात असतां तें अर्पण करण्याचा आपला मनोदय मी माझे विद्वान् व प्रेमळ गुरुवर्य बाळकृष्ण भाऊ जोशी यांना कळविला आणि त्याला मान देऊन त्यांनीं आपली संमति दिली याबद्दल मी त्यांचे अंतःकरणपूर्वक आभार मानतों. यानंतर आभार मानण्याचें शेवटचें परंतु आद्य-कर्तव्यात्मक कार्य राहिलें. तें कार्य ह्मणजे लोकमित्राचे विद्वान् व अनुभविक संपादक आणि आपल्या धनंजय प्रेसाच्या द्वारें महाराष्ट्र वाङ्मयांत अमूप भर टाकणारे धाडसी प्रकाशक रा. रा. दत्तात्रय गोविंद सडेकर यांचे आभार मानण्याचें होय. श्रीयुत सडेकर यांनीं वरचेवर तो

पाठवून प्रेमळ वाणीनें मला उत्साहित केलें म्हणूनच माझ्या हातून ही अल्पस्वल्प सरस्वतीसेवा घडली, तशा प्रेमाच्या जिव्हाळ्याचे शब्द मला उत्साहित करण्यास कारणीभूत न होते तर हा ग्रंथ बाहेर पडता ना. हा ग्रंथ मजकडून लिहून घेऊन प्रकाशित केल्यामुळें याच्या जन्माचें सर्व श्रेय त्यांनाच आहे. त्याबद्दल जितके आभार मानावे तितके थोडेच होणार आहेत.

सरस्वतीमंदिर, वांई.<br>ता. २७।७।१६.

आपला कृपाकांक्षी,<br>शिकंदरलाल आतार.

---



# अमेरिकेच्या
## व्यवसायोन्नतीचा
# इतिहास[1].

पातालदेशस्थ जनैर्नितान्तम् ।
व्यापार कार्यादिह जीवलोके ॥
लब्धं परं मानव ससृतौ ते,
रौन्नत्य मस्मात् च सेव्यतां कर्म्[2] ॥

## अमेरिकेच्या व्यवसायाच्या इतिहासांतील आर्थिक परिवर्तन.

जगांतील अन्य राष्ट्रांच्या व्यवसायाची उन्नति व अमेरिकेच्या व्यवसायाची उन्नति यांत महदंतर

---

१ प्रस्तुत लेख श्रीयुत जगन्नाथ खन्ना बी. एस् सी. ई. ई. ( अमेरिका ) यांच्या " अमेरिका का व्यवसाय और उसका विकास " नामक पुस्तकाचा अनुवाद आहे. श्रीयुत खन्ना यांनीं आपल्या पुस्तकाच्या अनुवादास उदार अंतःकरणानें परवानगी दिली याबद्दल प्रस्तुत लेखक त्यांचा अत्यंत आभारी आहे.

२ अमेरिकन लोकांनीं या पृथ्वीतलावर व्यापारकार्यां सर्व मानवजातींमध्यें मोठी उन्नति करून घेतली आहे. ह्याकरि सर्वत्रांनीं व्यापाराचा अंगीकार करणें अत्यावश्यक आहे.

आहे. इतर राष्ट्रांनीं आपली उन्नति हळूहळू करून घेतली परंतु अमेरिकेस ती एकदम करून घ्यावी लागली. कां कीं, युरोपांतील सुधारलेल्या जनतेला एकाएकीं एका जंगली व रानटी देशांत जाऊन रहावें लागलें आणि तेथें त्यांना आपला संसार थाटावा लागला. त्यांना जगांतील जीवन-कलहार्थ चाललेल्या चढाओढीच्या शर्यतींत मार्गक्रमण करतां यावें ह्मणून आपल्या देशांत गिरण्या, कारखाने वगैरे उघडून आपल्या व्यवसायांची उन्नति करणें भाग होतें. रानटी अमेरिकेंत जाऊन सुधारलेल्या युरोपवासियांनीं आपले कायदे, आचार, व्यवहार आणि व्यापार यांचा तेथें प्रचार केला. अशा प्रकारें अमेरिकेच्या व्यवसायास आरंभ झाला व तो त्यांना अल्प काळांतच युरोपांतील अन्य राष्ट्रांच्या बरोबरीस आणावा लागला.

अमेरिकेंतील ह्या वसाहतवाल्यांनीं अल्प काळांतच व्यापारांत आपली जी ही प्रगति करून घेतली ती त्यांनीं केवळ आपल्या सामर्थ्यानेंच घडवून आणिली नाहीं तर त्यास कित्येक बाह्य करणें अनुकूल झालीं. त्यांपैकीं एक कारण असें आहे कीं, ह्या वसाहतवाल्यांच्या मागून युरोपांतील निरनिराळ्या कलांमध्यें वाकबगार असे लोक अमेरिकेंत जाऊन राहूं लागले. त्यांनीं आपल्या बुद्धिमत्तेनें व सततोद्योगानें व्यवसायांच्या सुधारणेचा पाया घातला. ह्या लोकांनीं ज्या भागांत वस्ती केली तोच भाग विशेष सुधारलेला आहे. अमेरिकेच्या सर्व भागांत सुधारणेचा सारखाच

प्रसार झालेला नाहीं. त्याच्या कांहीं भागांत तर इतकी रानटी स्थिति आहे कीं, त्यांतील लोक नाण्यांचा उपयोग कसा करावा तें अद्याप जाणत नाहींत. ते आपलेजवळील गहूं देऊन गवळ्याजवळून दूध व कापडवाल्यापासून कापड घेतात, म्हणजे ते आपला सर्व व्यवहार अदलाबदलीनें किंवा विनिमयानें करतात. या देशांत सुधारणेचा प्रसार पूर्वेकडून पश्चिमेकडे होत गेला. कारण युरोपांतून येणारे लोक प्रथम पूर्वेकडे आपली वसाहत करीत. यामुळें पश्चिमेकडे त्यांची वसाहत होण्यास बराच कालावधि लागला. अगदीं पश्चिमभागांत कित्येक वर्षेंपर्यंत केवळ जंगली शिकारी लोकांचीच वस्ती होती. यांचे पूर्वेस राहणारे लोक गुराढोरांचे कळप पाळून त्यावर आपली उपजीविका करीत. यांच्याही पूर्वेस राहणारे लोक शेतीभाती करून आपला निर्वाह करीत. यांच्या अलीकडचे म्हणजे मध्य पूर्व मधले लोक कांहींसा व्यापार करीत होते. आणि देशाच्या अगदीं पूर्वभागीं म्हणजे अटलांटिक महासागराच्या कांठच्या प्रदेशांत मोठमोठीं शहरें वसलेलीं असून तीं नानाप्रकारच्या गिरण्यांनीं व कारखान्यांनीं समृद्ध झालीं होतीं.

एकाच देशांतील निरनिराळ्या भागांत कमजास्त सुधारणा झालेली असल्यास देशाच्या राज्यकारभारांत मोठी अडचण उत्पन्न होते. जो कायदा एका भागांत फायदेशीर होतो तो अशा स्थितींत दुसऱ्या भागांत हानिकारक होतो. ह्यामुळें देशाच्या निरनिराळ्या भागामध्यें कित्येक वेळां तं

उपस्थित झालेले आहेत. अमेरिकेच्या उत्तरभागांत मोठमोठे कारखाने असल्यामुळें त्या भागांतील लोकांना परदेशांतून आलेल्या मालावर कर बसवावा म्हणजे आपल्या मालाची भरभराट होईल असें वाटतें; परंतु दक्षिणभागांतील लोक हे शेतकरी पेशाचे आहेत त्यांना माल जितका स्वस्त परवडेल तितका पाहिजे आहे, त्यामुळें त्यांना परदेशी मालावर मुळींच कर बसवूं नये असें वाटतें. इ. स. १८७६ मध्यें जो घनघोर संग्राम झाला तो यामुळेंच. गुलामीची चाल दक्षिण अमेरिकावाल्यांना श्रेयस्कर आणि उत्तरअमेरिकावाल्यांना हानिकर होती. यामुळें ती चाल बंद करण्याचा जेव्हां कायदा करण्यांत आला तेव्हां दक्षिणअमेरिकनांनीं त्याचा जोरानें निषेध केला व उत्तरअमेरिकनांनीं तो प्रचलित करण्याचा पक्का निर्धार केला. यामुळें या दोन भागांतील वसाहतवाल्यांत भयंकर युद्ध माजलें. बंधु बंधूशीं लढले व देशांत तरुणांच्या रक्ताचे पाट वाहिले. अशा प्रकारें प्रायः कधीं कधीं कायद्याच्या प्रसाराच्या मतभेदामुळें भिन्न भिन्न भागांत तंटे उपस्थित होतात.

:o:

## अमेरिकेच्या रहिवाशांची प्रकृति.

युरोपांतील लोक जंगली अमेरिकेंत जाऊन राहिले तेव्हां त्यांना अनेक संकटांशीं झगडावें लागलें. रानटी नावरें व निर्दयी आदिनिवासी यांपासून आपलें रक्षण रण्याकरतां त्यांना सदैव तयार रहावें लागत असे. निबिड ण्य छाटून जमीन साफ करून घेऊन ती वसाहतीस

योग्य अशी त्यांना बनवावी लागे. अशा प्रकारच्या नानाविध संकटांशीं तोंड द्यावें लागल्यामुळें स्वाभाविकपणेंच त्यांचेमध्यें निरलसपणा, सततोद्योगीपणा, सशक्तपणा वगैरे गुणांचा प्रादुर्भाव झाला. व ते स्वावलंबी, उत्साही, दृढनिश्चयी व पूर्ण स्वतंत्र बनले. त्यांना जंगली जनावरांशीं सामना करावा लागे तेव्हां स्वसामर्थ्यावर सर्व मदार ठेऊनच दक्षतेनें त्यांशीं झगडावें लागे. कारण सरकार किंवा दुसरे लोक ह्यांपासून साह्य मिळण्याची बिलकूल आशा नसे. या बिकट परिस्थितीपासून त्यांना आत्मनिर्भरतेचा धडा मिळाला. जंगली जनावरांशीं कधीं सामना करावा लागेल याचा नेम नसल्यामुळें त्यांना सदोदित हुशार रहावें लागे. यामुळें सदा कार्यतत्पर राहण्याचा गुण त्यांचे ठिकाणीं आपोआपच उत्पन्न झाला. सदा संकटांशीं झगडावें लागल्यामुळें टक्केटोणपे खाऊन ते धीट, कठोर व निर्दय बनले.

वरील कारणामुळेंच अमेरिकन लोक आत्मविश्वासी पण बेपर्वा स्वभावाचे झाले आहेत. या लोकांनीं व्यवसायाच्या कामांत सर्व जगांत अघाडी मारली आहे. हे लोक वस्तूच्या संख्येवरच अधिक लक्ष देतात. त्यांच्या गुणधर्माकडे ढुंकूनही पहात नाहींत. हें त्यांच्या यांत्रिक शोधावरून स्पष्टपणें नजरेस येतें. कारण यांनीं जीं यंत्रें शोधून काढलीं आहेत, त्यांत अल्पशक्तीनें, अल्पकालांत जास्त काम कसें करतां येईल याकडेच विशेष नजर दिलेली आहे; परंतु त्याबरोबरच हुशार कारागीर बनविण्याकडे त्यांचें लक्ष नसल्यामुळें ते त्यांना युरोपांतील अन्य देशांतून आणावे लागतात.

——:*:——

# लोकसंख्येची विलक्षण वाढ.

अमेरिकेंत लोकसंख्येची वाढ मोठी आश्चर्यकारक झाली आहे. इ. स. १६४० मध्यें उत्तर अमेरिकेंत मूळचे रहिवासी सोडून २५००० लोकसंख्या होती. ती सत्राव्या शतकाच्या अंतीं २,६०,००० झाली. इ. स. १७४३ मध्यें ती दहा लाखांवर गेली. आणि इ. स. १७९० मध्यें केवळ संयुक्त राज्याची लो० सं० ३९,२९, २१४ झाली. नंतर पुढील शंभर वर्षांमध्यें प्रत्येक पंचवीस वर्षांत ती दुप्पट होत गेली. पुढें तेथें जें घनघोर रणकंदन माजलें त्यामुळें त्या वाढत्या जननसंख्येस आळा पडला तथापि तेथील लोकसंख्या जगांतील अन्य राष्ट्रांपेक्षां जास्त झपाट्यानें वृद्धिंगत होत आहे. ती इतकी कीं, इ. स. १७९० मध्यें संयुक्त संस्थानाची लो० सं० जी ३९, २९,२१४ होती ती इ० स० १९०५ मध्यें ८,२५,-७४,१९५ झाली; ह्मणजे अवघ्या एका शतकांत ७,८६, ४४,९८१ एवढी लोकसंख्या वाढली.

लोकसंख्येची वाढ इतक्या झपाट्यानें होत आहे तरी ह्या लोकांचा निर्वाह कसा होईल ही शंका त्यांच्या मनांत कधींच उद्भवली नाहीं. अद्याप तेथील जनसंख्या एकसारखी वाढतच आहे. पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, त्याबरोबरच मजूरांच्या अभावामुळें त्यांच्या मजूरीचा दरही वाढत आहे. देशाची अप्रतिहत वाढती लोकसंख्या अव-

लोकन करून कित्येक लोकांस वाटलें कीं, लौकरच हा देश कंगाल बनून येथें दारिद्र्यदेवतेचें कायमचें अधिष्ठान होणार. परंतु तें अनुमान निखालस फोल ठरलें. देश दरिद्री होण्याचें बाजूसच राहिलें पण उलट तो संपन्न मात्र होत चालला. लोकसंख्येच्या वाढीबरोबरच धनवृद्धीस प्रारंभ झाला. मोठमोठे कारखाने उघडले गेले; आणि निरनिराळ्या प्रकारच्या नवीन कलांचे शोध लागूं लागले. संपत्त्योत्पादनाची जंगी लाट देशभर उसळली. याचा परिणाम असा झाला आहे कीं, देशांत वाजवीपेक्षां फाजील संपन्नावस्था प्राप्त झाल्यामुळें लोकांत चैन, रंगेलपणा, व्यसनें वगैरेंचा फैलाव झाला असून त्यामुळें लोकसंख्येचा दिवसेंदिवस ऱ्हास होत चालला आहे. ही गोष्ट धनाढ्य लोकांचीच आहे असें नाहीं तर साधारण मजूरदारांची सुद्धां ख्यालीखुशाली वाढली असून त्यांच्यांतील रांकटपणाच्या गुणांचा ऱ्हास होऊन शारीरिक शैथिल्याबरोबरच प्रजोत्पादनशक्तीस शैथिल्य येत आहे !! साधारणतः नैसर्गिक सृष्टिनियम असा आहे कीं, स्वकष्टानें उदरंभरण करणाऱ्या गरीबगुरिबांत व भिक्षुकांतच संततीची समृद्धि अधिक होते.

ह्यामुळें आतां अमेरिकेंतील विद्वान् लोकांचें चित्त याकडे वेधलें असून सध्यां यावर मोठा कडाक्याचा वादविवाद व भवति न भवति होत आहे. संतति उत्पन्न होण्याचें प्रमाण दिवसेंदिवस कमी कां होत आहे याचा

खल करून विद्वान् लोकांनीं असा सिद्धांत काढला आहे कीं, सर्व लोक मानसिक कार्यांत व्यग्र राहिल्यामुळें ते हळुहळू कमकुवत होत चालले आहेत. अर्थात् जीं मनुष्यें ज्यांत श्रेष्ठत्व संपादन करून समाजांत उच्च दर्जांत वावरत आहेत त्यांच्यांत सर्वांत कमी संतत्युत्पत्ति होते. अशा प्रकारें सर्व-गुणश्रेष्ठ व उच्च दर्जाच्या लोकांच्या नष्टांशामुळें देशाला अत्यंत भयंकर विपत्तींत पडावें लागेल. राष्ट्राच्या अभ्युदयाच्या दृष्टीनें त्याच्या लोकसंख्येची अभिवृद्धि झाली पाहिजे असें नाहीं. परंतु तेथील जनसंख्येची वाढ तर एकसारखी होत आहे. यामुळें देशांतील विचारी व विद्वान् लोकांपुढें असा प्रश्न येऊन पडला आहे कीं, कनिष्ट दर्जाच्या लोकांची वाढ जशी वाढत्या प्रमाणावर आहे तशी मध्यम व उच्च प्रतीच्या कोटींतील मनुष्यांची वाढ कोणत्या उपायानें होईल ? त्यांचा ऱ्हास होत आहे तो कसा थांबविता येईल ? या प्रश्नाचें उत्तर विद्वान् लोक असें देतात कीं, उच्च कोटींतील मनुष्यांचा ऱ्हास होण्याचा नियम सृष्टींत पूर्वींपासूनच चालत आलेला आहे. या ऱ्हास कार्यानें भविष्यत्काळीं कांहींहि दुष्परिणाम घडून येणार नाहीं. कारण ही ओरड फार प्राचीनकाळापासून चालत आलेली आहे. पुढेंही ती तशीच चालावयाची. धनवान् उच्च कोटींतील मनुष्यांस संतान न झाल्यामुळें त्यांच्या जागा रिकाम्या होतात. त्यामुळें कनिष्टप्रतीच्या लोकांतील हुशार माणसांचा उत्साह वृद्धिंगत होऊन तीं त्या जागा

भरून काढण्याचा प्रयत्न करतात व 'चक्रनेमिक्रमेण' संसाराच्या उलाढालींत उच्च श्रेणीचे लोक नीच स्थितींत व नीच श्रेणींतील लोक उच्च कोटींत पोहोंचून पूर्ववत् समाजस्थिति रहावयाची. तथापि उच्च दर्जाच्या लोकांची वागणूक नीतिदृष्ट्या उच्च दर्जाची राहिल्यास त्यांस संतति-हीन होण्याची भीति नाहीं. संतति होवो अगर न होवो कोणत्याही जातीमध्यें तिचें स्वत्व कायम राहिलें ह्मणजे तिनें आपले आचारविचार, आपला स्वाभिमान आणि आपली उन्नति करण्याकरितां अव्याहत प्रयत्न केला ह्मणजे ती कधींही लुप्तप्राय होत नाहीं.

अमेरिकेंतील ह्या लोकसंख्येच्या वाढीमुळें दुसरा एक अत्यंत बिकट प्रश्न असा उत्पन्न झाला कीं, गिरण्या, कार-खाने हीं शहरांतून उघडलीं गेल्यामुळें खेड्यापाड्यांतील शेतकरी शहरांत जाऊन राहूं लागले. इ० स० १७९० मध्यें अमेरिकेच्या लोकसंख्येपैकीं प्रत्येक हजारीं ३३ या-प्रमाणें ८००० पेक्षां जास्त वस्तीच्या शहरांत राहणाऱ्या लोकांचें प्रमाण होतें. पण इ० स० १९०० मध्यें शेंकडा ३३ मनुष्यें तेवढ्या मोठ्या शहरांतून रहात असल्याचें आढळून आलें. अशा प्रकारें लोक आपलीं गांवें सोडून शहरांत जाऊन राहूं लागले ह्मणजे सामाजिक, औद्योगिक व राजनैतिक संबंध अत्यंत भानगडीचे व बिकट होतात. अशा प्रकारें लोक आपलीं गांवें सोडून शहरांत जाऊन राहूं लागल्यानें त्यांचा जितका संततिऱ्हास होऊं लागतो

तितका त्यांच्यांत संपत्तीमुळें येणाऱ्या नाजुकपणानें किंवा स्त्रियांच्या जननशक्तीच्या कमकुवतपणानें होत नाहीं. कारखाने वाढल्यानें शहरांतील जनसंख्या वाढते व जनसंख्येची वाढ झाल्यानें शहरांत आरोग्यास हितकर अशा हवा, पाणी वगैरेंचा अभाव होऊन निर्वाहाच्या साधनांचे ह्मणजे अन्नवस्त्रांचे भाव वाढतात. अशा ठिकाणीं खेड्यापाड्याच्या जोमदार हवेंत वाढलेले तरुण द्रव्यार्जनाच्या लोभानें येऊन राहून लौकरच आपलें शारीरिक स्वास्थ्य गमावून आपला शारीरिक अधःपात करून घेतात. तसेंच खेड्यांपेक्षां शहरांत चैनीचीं साधनें विशेष असल्यामुळें त्यांच्या नादीं लागून तरुण मंडळी आपला नैतिक अधःपातही करून घेतात. अशा प्रकारें कांहीं काळ लोटल्यावर प्रजा निर्बळ, निःसत्व व रोगी बनते व प्रजोत्पत्तीस नालायक झाल्यामुळें तिची वाढ खुंटते.

——:X:——

## गुलामी आणि हबशी.

युरोपीयन लोकांनीं अमेरिकेंत वसाहत केली, तेव्हां त्यांतील शेतकरी व व्यापारीवर्गाच्या लोकांस प्रथमतः मजूरांची वाण पडली. तेव्हां त्यांची भरती कोठून करावी ? व ते व्यापार आणि धन यांच्या वृद्धीस साह्यभूत होणारे असे कसे मिळतील ? याची त्यांना मोठी विवंचना पडली. तेव्हां सध्यां हिंदुस्थानांतून जसे कांहीं अटींवर कुली लोक

परदेशीं पाठविले जातात तशा प्रकारें युरोपांतून मजूर लोक आणविण्याचें ठरवून त्याप्रमाणें त्यांनीं त्यांची मागणी केली. इ. स. १६२० ते १६५० च्या दरम्यान जितकीं मनुष्यें व्हर्जिनियामध्यें गेलीं तीं सर्व अशा प्रकारच्या शर्तींनीं बांधले गेलेले गोरे कुली होते. इ. स. १६८० मध्यें एका इंग्रज ऑफिसरनें आपला असा अंदाज प्रसिद्ध केला होता कीं, अमेरिकेंत प्रतिवर्षीं १०,००० मनुष्यें फुसलावून पळवून नेलीं जातात. या प्रकारच्या लोकांमध्यें फौजेमधून पळून आलेले शिपाई, कर्ज वारण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें पळून जाणारे लोक, आईबापांच्या कह्यांत न वागणारीं उच्छृंखल पोरें, चोर, खुनी किंवा अशाच प्रकारचे बदमाष स्त्रीपुरुष यांचा भरणा असे. यांच्याबरोबर अत्यंत कठोर व पशुतुल्य वर्तन ठेविलें जात असे. परंतु ते गोऱ्या कातडीचे असल्यामुळें इतर स्वतंत्र लोकांत कालांतरानें ते मिळून जात यामुळें त्यांचेबद्दल कधीं विशेषसा बभ्रा झाला नाहीं.

इ. स. १६१९ मध्यें सर्वांत पहिला हबशी गुलाम व्हर्जिनियामध्यें भरती झाला. पहिल्या तीस वर्षांमध्यें यांची संख्या विशेष वाढली नाहीं. पण तदनंतर आणि अठराव्या शतकाच्या अंतीं या हबशी गुलामांची संख्या गोऱ्या कुलींच्या संख्येपेक्षां पुष्कळच वाढत गेली. इ. स. १७९० मध्यें ७,५०,२०८ हबशी किंवा त्यांची संतति युनायटेडस्टेट्स्मध्यें होती. अर्थात् ही संख्या एकंदर लोकसंख्येच्या मानानें शेंकडा १९। होती. परंतु इ० स०

१७९० नंतर ह्यांची संख्या कमी होत गेली. इ० स० १९०० मध्यें ह्यांची एकंदर संख्या ८८,४०,६८६ होती. ह्मणजे एकंदर लोकसंख्येच्या मानानें शेंकडा ११॥ राहिली. हें प्रमाण कमी होण्याचें कारण काळ्या लोकांपेक्षां गोऱ्या लोकांची पैदास जास्त प्रमाणावर झाली हें होय.

ह्या देशामध्यें काळ्या हबशी लोकांची कायम वसाहत झाल्यामुळें राजकीय, सामाजिक व आर्थिक बाबींमध्यें अत्यंत भानगडी उपस्थित झाल्या आहेत. ह्या लोकांबद्दल गोऱ्या लोकांच्या मनांत स्वाभाविकपणेंच तिरस्कारबुद्धि वास करीत आहे; ह्मणून ह्यांना दक्षिणेंतील कापसाच्या लागवडीच्या प्रदेशांत पृथक काढण्यांत आलें आहे. हे लोक अशिक्षित असून यांची रहाणी व खाणेंपिणें हीं गलिच्छ व किळस आणणारीं असतात व यांना हलकीं-सलकीं भिकार कामें करण्यांतच आनंद वाटतो. इ० स० १९०० मध्यें यांच्या लोकसंख्येपैकीं शेंकडा ६३ पुरुष व शेंकडा ६० स्त्रिया रस्ते लोटणें, भांडीं घांसणें इत्यादि नीच कामांमध्यें नियुक्त झालीं होतीं. या अवनतीचें कारण त्यांची बेपर्वाई व आळस हीं तर आहेतच. पण विशेष कारण ह्मणजे गोरे लोक त्यांचा तिरस्कार करतात व त्यांना आपल्याशीं मिळून मिसळून वागूं देत नाहींत हें होय. गोऱ्या लोकांनीं आपलीं पंचायतें स्थापन करून त्यांच्या नियमांत हबशी मनुष्य जेथें उच्च अधिकारावर नेमलेला असेल तेथें गोऱ्या कारागिरांनीं काम करावयाचें नाहीं असें

एक कलम घालून ठेविलें आहे. अशा प्रकारें उच्च प्रतीच्या कारागिरीच्या कामांतून त्यांच्या गोऱ्या शत्रूंनीं त्यांचें कायमचें उच्चाटन केलें आहे. सध्यां दक्षिण अमेरिकेंतील सरकार ह्या दुर्दैवी हबशी लोकांच्या उद्धारार्थ ठिकठिकाणीं कारागिरीचे स्कूल्स उघडण्याच्या खटपटींत आहे. थोडासा शिक्षणाचा प्रसार त्यांच्यामध्यें सध्यां झाला आहे. तेव्हां आतां लौकरच यांची सुधारणा होऊन ते आपल्या गौर-काय देशबंधूंच्या बरोबरीस कालांतरानें कां होईना येतील अशी आशा बाळगण्यास पुष्कळ जागा आहे.



## परदेशस्थ लोकांचें आगमन
## व
## त्यांच्या वसाहती.

हबशी लोकांच्या प्रश्नानंतर परदेशी लोक अमेरिकेंत येऊन वसाहत करितात, त्यांच्यासंबंधींचा प्रश्न अमेरिकनांच्या पुढें नेहमीं दत्त ह्मणून उभा राहतो. हा देश जेव्हां इंग्लंडच्या ताब्यांत होता, तेव्हांच ह्मणजे इ. स. १६८५ मध्यें तेथील त्यावेळचे गव्हर्नर थामस डोंगन यांनीं इंग्लीश सरकारास सुचविलें कीं, परदेशीय लोकांच्या आगमनास जर आपण आळा घातला नाहीं तर देशाची लोकसंख्या वाढल्यामुळें मोठें अरिष्ट उत्पन्न होईल. अमेरिकेचे कट्टे देशभक्त जार्ज वाशिंग्टन आणि जेफर्सन हे

सुद्धां परस्थांस येऊं देण्यास व त्यांना वसाहत करूं देण्यास पूर्ण मुभा असूं नये, त्यांस धरबंद घालण्याकरतां कांहीं नियम ठरविणें इष्ट आहे, असें प्रतिपादीत होतें. पण प्रत्यक्ष असा कांहींच निर्बंध अमलांत आला नाहीं. याचा परिणाम असा झाला कीं, देशांत परदेशीय लोकांचा भरणा बेसुमार झाला. त्यामुळें सर्व अमेरिकन लोकांचें चित्त त्याकडे वेधलें. इ. स. १८६८ मध्यें २,२३,२९९ परकीय लोक अमेरिकेंत भरती झाले. पण इ. स. १९०७ मध्यें १,२८,५३,३४९ लोक येऊन राहिले. परदेशी लोकांच्या आगमनाची ही दिवसेंदिवस वाढत जाणारी संख्या कमी कशी करता येईल. याचा विचार करण्याकरतां कांग्रेसनें एक कमिशन बसविलें होतें. त्याच्या सल्ल्यानें परदेशीयांच्या ह्या वाढत्या आगमनास आळा घालणारा कायदा पसार करण्यांत आला.

अमेरिकेंत लागवडीस लायक अशी पुष्कळ जमीन पडीक स्थितींत पडून राहिली आहे. ती उपयोगांत आणण्यास परकीयांस मुभा आहे. व कारखान्यांत सदा मजुरांची आवश्यकता असते. यामुळें देशांत परकीय लोक जितके येतील तितके पाहिजेच आहेत पण अमेरिकन लोक इतकेंच इच्छितात कीं, जे लोक येणार ते सच्छील व देशोन्नतीस साह्यभूत होणारे असे असावेत. भूमीस भारभूत होऊन राष्ट्राच्या अधःपातास कारणीभूत होणारे नसावेत. प्रथमतः इंग्लंड, जर्मनी वगैरे उत्तर युरोपीयन

राष्ट्रांतील लोकांचा भरणा तेथें होत होता. पण आतां दक्षिण युरोपांतील लोकांचाच भरणा विशेषतः असतो. उत्तर युरोपवासी लोक स्वातंत्र्यप्रीय, पराक्रमी आणि सुशिक्षित असतात. पण दक्षिण युरोपांत शिक्षण आणि सुधारणा यांचा विशेष प्रादुर्भाव झालेला नाहीं. यामुळें ते लोक त्यांपेक्षां कमी दर्जाचे असतात त्या लोकांना आपल्या कर्तव्यास प्रेरित करील व त्यांच्यांत उत्साह उत्पन्न करील असा त्यांचा ह्मणून कांहीं इतिहास उपलब्ध नाहीं. ते लोक कित्येक वर्षें शत्रूंच्या ताब्यांत राहून त्यांचें दास्यत्व करीत आले आहेत. आणि त्यांच्या अंगीं कित्येक शारीरिक व मानसिक व्यंगें खिळून राहिलीं आहेत.

कांहीं वर्षांपूर्वीं परदेशीय राष्ट्रांतील सरकार व परोपकारिणी सभा लोकांस अमेरिकेंत जाऊन वसाहत करण्यास उत्साहित करून त्या कामीं त्यांस प्रवृत्त करीत. व त्यांना मदतीची अपेक्षा असल्यास तीही करीत. त्यामुळें व युरोपांत दुष्काळ पडला किंवा युद्ध उपस्थित झालें तर त्यामुळें पुष्कळ पराक्रमी व स्वातंत्र्यप्रीय लोक अमेरिकेंत जाऊन वसाहत करीत. युद्धास त्रासून कित्येक कारागीर लोक स्वदेशत्याग करून अमेरिकेंत जात व तेथील कारखान्यांत समाविष्ट होत. व अमेरिकेच्या व्यापाराचें संवर्धन करीत. पण आतां तेथें प्रवेश करूं इच्छिणारे परकीय लोक बहुंशी आळशी आणि अशिक्षित असतात. ते तेथील शहरांत प्रवेश करून गलिच्छ गल्ल्यांतून राहतात

व नानाप्रकारच्या दुष्ट व्यसनांच्या आधीन होऊन अनन्वित कर्में व अत्याचार करतात. यामुळें अशा लोकांच्या आगमनानें देशाच्या प्रगतीस चलन तर मिळत नाहींच पण ते अध:पातास मात्र साह्यभूत होतात. आतां या गोष्टीकडे अमेरिकन लोकांचें लक्ष गेलें असून ते त्यांस आळा आणण्याचा प्रयत्न करीत आहेत. परंतु देशांत कारखाने, शेती व व्यापार यांची वृद्धि होत असल्यामुळें मजूरदार व हुशार कारागीर यांची तेथें आवश्यकताच आहे. यामुळें योग्य माणसें आपल्या देशांत येत असल्यास त्यांचें स्वागत करण्यास अमेरिकन लोक एका पायावर तयार आहेत. अशीं योग्य माणसें कशीं मिळवावींत हा प्रश्न सध्यां अमेरिकन लोकांपुढें उपस्थित झालेला आहे.

—:*:—

## नैसर्गिक संपत्ति.

अमेरिकेच्या व्यवसायोन्नतीचीं मुख्य कारणें दोन. एक तेथील रहिवाशांची दिलदार, उदात्त व सुदृढ प्रकृति व दुसरें, तेथील भूमिगर्भस्थ नैसर्गिक विपुल धनसंचय. नानाप्रकारच्या बहुमूल्य व लाभदायक खाणी, मोठमोठ्या नद्या, उंच प्रदेशांतील कालवे व निर्झरसंघ वगैरे नैकविध ईश्वरदत्त देणग्याचें तेथें वैपुल्य असल्यामुळें जगांतील अत्यंत संपन्न व उपयुक्त प्रदेशांपैकीं हा एक प्रदेश आहे. युरोपखंडाप्रमाणें विपुल समुद्रकिनारा असलेल्या या विस्तीर्ण

प्रदेशांत मोठमोठीं बंदरें व विराट् नद्यांच्या खाड्या यांचें प्राचुर्य असल्यामुळें जलवाहनांनीं अल्प व्ययानें, अल्पल्प कालांत मालाची ने-आण करितां येते. उंच प्रदेशांतून वाहणाऱ्या निर्झरांच्या साह्यानें विद्युच्छक्ति निर्माण करून तिच्या योगानें शेंकडों कारखाने चालवितां येतात. अमेरिकेंत सर्व प्रकारचें हवामान व सर्व प्रकारच्या जमिनी आहेत. नानाप्रकारच्या तृण-वनस्पतींनीं परिपूरित अशीं अफाट अरण्यें मुबलक आहेत, व सर्व प्रकारच्या खनिज पदार्थांची समृद्धि आहे. तेव्हां अशा सर्वांगपरिपूर्ण देशांत व्यवसायाची उन्नति होणार नाहीं तर कोठें होईल ? अमेरिकेंत लोखंड, कापूस, कोळसा, सोनें, रुपें, दूध, लोणी, मका, गहूं, जस्त, तंबाखू, रॉकऑईल इत्यादि पदार्थांची जितकी पैदास होते तितकी जगांतील इतर कोणत्याही देशांत होत नाहीं.

अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांत २९,७२,६८४ चौरस मैल जमीन आहे. त्यांतील ३/४ भाग जमीनींत अद्याप मनुष्यवस्ती झालेली नाहीं. ह्या प्रदेशांतील बराच मुलूख तेथील सरकारनें मोठमोठ्या शिक्षणसंस्थांस मोफत देऊन टाकिला आहे. त्याची लागवड करून त्यापासून होणाऱ्या उत्पन्नावर त्या संस्था आपला योगक्षेम चालवितात. तसेंच रेलवेकंपन्या व इतर लोकोपयोगी संस्था आणि सभा ह्यासही कांहीं प्रदेश दिला आहे. ज्यांस घरें नाहींत अशा निराश्रित लोकांसही यांतील प्रदेश देण्यांत आला आहे. अशा प्रकारें लोकांस व संस्थांस जमिनी मोफत देऊन तेथील सरकारानें व्यवसायमंदिराचा पाया घातला आहे.

अमेरिकन सरकारनें इ. स. १८६२ मध्यें गृहसंबंधीं एक कायदा पसार केला. त्या कायद्यान्वयें कोणीही मनुष्य कोठेंही जमीन फुकट मिळवून तिच्यावर थोड्याशा सायासानें आपलें गृह उभारून आपला व आपल्या परिवाराचा चरितार्थ उत्तम रीतीनें चालवूं शकतो. एकाद्या कारागिरास शहरांत जाऊन राहून स्वतंत्रपणें एकादा धंदा करावासा वाटला किंवा कोणास एकाद्या ठिकाणची पडीक जमीन घेऊन ती लागवडीस आणण्याची इच्छा असली तर ह्या कायद्यान्वयें तसें करतां येतें. ह्यामुळें अमेरिकेंतील कलाकौशल्यास ऊर्जितावस्था प्राप्त होण्यास मदत होऊन स्वतंत्र विचारांचीं व कर्तृत्ववान् माणसें पुढें येतात. व त्यांच्या गुणांचें चीज होऊन त्यांचें जन्मसाफल्य होतें. इ. स. १९०४ पर्यंत अमेरिकन सरकारनें शेतकऱ्यांस १०,६२, ४०,४६४ एकर जमीन कांहींहि मोबदला न घेतां ह्मणजे अगदीं मोफत वांटली. ह्याशिवाय १७,८०,०१,६१२ एकर जमीन अगदीं थोड्या किंमतीस विकली.

अशा प्रकारें अमेरिकन सरकार कोठपर्यंत जमीन वाटूं शकेल तें निश्चित सांगतां येत नाहीं. कारण, प्रतिवर्षी १॥–२ कोटी एकर जमीन मोफत वांटली तरी प्रारंभीं ह्मणजे देश स्वतंत्र झाला त्या वेळीं जितकी जमीन त्या सरकाराजवळ होती तितकीच अजून शिल्लक आहे. यांतील बहुतेक जमीन अरण्यमय व क्षारयुक्त आहे. तथापि नहरांच्या साह्यानें ही जमीन लागवडीच्या लायक करतां येण्या-

सारखी आहे. याशिवाय देशांतील धनिक लोक शेतीच्या उन्नतिप्रीत्यर्थ प्रतिवर्षीं लाखों रुपये खर्चून व नानाप्रकारचे नवीन नवीन शोध लावून तींत प्रगति करून घेत आहेत. अशा प्रकारें तेथील लोकांना जमीन मोफत मिळते तरी ते तिच्या मेहनतीस कमी मजुरीवर काम करणारे अशिक्षित मजूर न लावतां भारी मजुरी घेणारे वाकबगार लोक लावतात. कारण, भारी मजूरीवर काम करणारे उच्च दर्जाचे मजूर व कारागीर हे आपल्या नैपुण्यानें आपल्या व्यवसायास लवकरच उच्च दर्जेस पोंहचवितात.

आतांपर्यंत अमेरिकेंत व्यवसायोन्नति होण्यास कोणकोणतीं अनुकूल अशीं पूर्व कारणें विद्यमान होतीं याचें विवेचन केलें. आतां तेथें व्यवसाय कसकसा प्रस्थापित होत गेला याचें विवेचन करूं.

———:×:———

## अमेरिकेचा व्यापार.

इंग्लंडप्रमाणें अमेरिकेंतही प्रारंभीं व्यापार व व्यवसाय हे सरकारच्याच हातीं होते. ते त्यानें कायद्याच्या बंधनांनीं नियंत्रित केले होते. कातडें, लोखंड, कागद, रेशीम आणि कापड यांचे कारखाने उघडण्याकरितां सरकार द्रव्यसाह्य करून लोकांना उत्साहित करी. लोखंडाच्या कारखान्यास जमीन मोफत देण्यांत येई व त्यावर कोणताही कर घेतला जात नसे. देशांत लागणाऱ्या जोड्यांचा ( बुटांचा ) पुरवठा स्वदेशांतूनच करतां यावा ह्मणून अमेरिकन सरकारनें

तत्संबंधीं एक कायदा केला होता. त्याअन्वयें देशांत तयार होणारें कातडें आपल्या देशांतील कारखान्यासच द्यावें लागे. इतकेंच काय पण कारणावांचून तें घरींहि ठेवतां येत नसे. तसें कोणी ठेविल्यास त्यास २०० रुपयांपर्यंत दंड होई. ह्या कायद्याची अंमलबजावणी करण्याकरितां स्वतंत्र इन्स्पेक्टर नियुक्त करण्यांत आले होते.

तसेंच मजुरांनीं आळशी होऊं नये ह्मणून त्यांच्याकरितांही कांहीं नियम ठरविण्यांत आले होते. त्यांच्या कामाच्या वेळा ठरविण्यांत आल्या होत्या व त्यांच्या मजूरीचे दरही सरकारनें ठरवून टाकिले होते. नियमित मजूरीपेक्षां जास्त मजूरी मागणारा मजूर व तशी मजूरी देणारा मालक हे दोघेही दंडास पात्र होत; परंतु हा अत्याचारी कायदा विशेष फलप्रद झाला नाहीं. ह्या वेळीं शेतीकरतां जमीन मुबलक व स्वस्त मिळत होती आणि मजूरांची तर वाण असे. यामुळें मजूरही मर्जीप्रमाणें मजूरी घेऊं पहात व मालकही आपल्या गरजेकरतां ती देण्यास तयार असत. असा हा खुषीचा सौदा होत असून त्यास कायद्यानें हरकत करण्यांत येई. ही दडपशाही अर्थातच उभय पक्षासही दु:सह होऊं लागली. शिवाय तत्कालीन लोकही मोठे स्वातंत्र्यप्रीय होते; त्यांना हा कायदा मुळींच पसंत झाला नाहीं. ते त्याचा उघड उघड प्रतिकार करूं लागले. अशा प्रकारें इंग्लंडच्या सत्तेच्या उच्चाटनाचें बीज अमेरिकनांच्या सुपीक अंत:करणांत रुजून तें लवकरच फलीभूतही झालें.

इंग्लंड आपल्या ताब्यांतील व निकटवर्ति देशांतील कच्चा माल आपल्या देशांत नेऊन आपल्या कारखान्यांतून त्याचा पक्का माल बनवून तो पुनः अमेरिकेंत चांगल्या किफायतशीर भावानें विकण्यास इच्छित होतें. तसेंच आपल्या ताब्यांतील देशांत चालणारा व्यापार आपल्या स्वाधीन असावा असें त्यास वाटत होतें. याकरतां तें ताग, नीळ, कापूस वगैरे उत्पन्न करणाऱ्या शेतकऱ्यास द्रव्यसाह्य करीत असे. परंतु जे लोक असें साह्य न घेतां स्वतंत्रपणें आपला व्यवसाय करूं पहात त्यांस अवरोध करण्याकरितां कडक नियम बनविण्यांत येत असत. उदाहरणार्थ अमेरिकनास त्या वेळीं लोखंडी सामान बनविण्याचा कारखाना काढण्याची मनाई होती. अशा प्रकारचीं शेंकडों उदाहरणें वाचकांनीं इंग्लंडचा इतिहास अवलोकिला असतां त्यांना आढळतील. इंग्लंडची ही व्यापारनीति अमेरिकेंत मुळींच सफल झाली नाहीं. ह्या व्यापारनीतीनें अमेरिकेच्या व्यवसायांचा किंवा व्यापाराचा अधःपात होऊन त्यांचा नायनाट होण्याचें बाजूस राहून उलट तो दुप्पट जोरानें उन्नतिपथास लागला. ह्या अन्यायमूलक प्रकारामुळें अमेरिकनांचा स्वाभिमान जागृत झाला. स्वदेशप्रेमाच्या वाऱ्यानें त्यांचीं अंतःकरणें थरारून जागीं झालीं व आपल्या देशाच्या व्यवसायाची उन्नति करणें हें आपलें परम पवित्र व श्रेष्ठ कर्तव्य आहे असें त्यांस वाटूं लागलें. ह्यामुळें इ. स. १७८६ मध्यें जेव्हां अमेरिका इंग्लंडच्या पंजांतून

मुक्त होऊन तें स्वतंत्र राष्ट्र बनलें तेव्हां अमेरिकन सरकारानें जाहीर केलें कीं, राजकीय व्यक्तिस्वातंत्र्याबरोबरच प्रत्येक व्यक्तीस व्यवसायसंबंधीं व सामाजिक विषयासंबंधीं पूर्ण स्वातंत्र्य मिळेल. त्याप्रमाणें सर्व जनतेस स्वातंत्र्याची प्राप्ति होतांच अमेरिकेच्या व्यवसायास कांहीं निराळाच रंग चढला. त्याच्या बाल-रोप्यास स्वातंत्र्याच्या वसंतागमनानें बहार येऊन तो जोरानें फोफावूं लागला. गेल्या शंभर सव्वाशें वर्षांत त्याची इतकी वाढ झाली आहे कीं, त्याच्या शाखाप्रशाखांनीं साऱ्या जगांत आपलें जाळें पसरवून टाकलें आहे. त्याच्या स्निग्ध छायेचा लाभ साऱ्या जगास लाभत आहे. हा प्रभाव कशाचा ? तर एका स्वातंत्र्याचा. स्वदेशी उद्योगधंद्यांची ह्मणा, साहित्यांची ह्मणा किंवा अन्य कोणत्याही राष्ट्रीय हितबाबींची ह्मणा, पूर्ण उन्नति करावयाची असेल तर त्यास स्वराज्यच पाहिजे. स्वातंत्र्यसूर्याच्या सुधासिंचनाशिवाय त्यांत चैतन्य उत्पन्न होणें शक्य नाहीं, त्यांची वाढ व्हावयाची नाहीं, व तत्प्रीत्यर्थ केलेले श्रम कधींही सफल व्हावयाचे नाहींत.

———:o:———

## इ. स. १७७६ तील अमेरिकेचा व्यवसाय.



इ. स. १७७६ मध्यें इंग्लंडच्या शासनाविरुद्ध महायुद्ध उपस्थित झालें. ह्या वेळीं अमेरिकेचा व्यापार अगदीं बाल्यावस्थेंत होता. केवळ कच्च्या मालाचाच व्यापार विशेष

जोरावर होता. तेथील जंगलांत लांकूड मुबलक मिळत असे. तें कापून इंग्लडला पाठविलें जाई. माशांचा व्यापारही पुष्कळ चाले. जहाजें बनविण्याचें कामही बऱ्याच प्रमाणावर चालत असे. इ. स. १७७५ मध्यें इंग्लंडजवळ जीं जहाजें होतीं त्यांतील $\frac{1}{3}$ जहाजें अमेरिकेंत बनलेलीं होतीं. तेव्हां तेथें शेतीही पुष्कळ चाले पण तिच्यापासून फारसें पीक निष्पन्न होत नसे. त्या वेळीं तेथें कारखाने बिलकूल नव्हते. तथापि कांहीं लोक चरक वगैरेच्या द्वारें सूत काढून व अशाच प्रकारें ओबडधोबड साधनांनीं इतर व्यवसाय करून आपली गरज भागवीत असत. पूर्वभागीं शेती करून राहणारा शेतकरी आपल्या घरीं आपणास अवश्य लागणाऱ्या वस्तू स्वतःच बनवी. यामुळें त्याला मीठ व लहान लहान शेतीचीं हत्यारें ह्यांशिवाय कांहीं खरेदी करावें लागत नसे. तेव्हां बाहेर पाठविण्यासारखे कोणतेही पदार्थ बनत नव्हते. शिवाय तेव्हां रेलवेचे फांटे नव्हते. इतकेंच काय पण दळणवळण करण्यास सोयीस्कर असे रस्तेही नव्हते. बहुतेक लोक शेतकीचाच व्यवसाय करीत होते. इ. स. १८८७ मध्यें तेथील लोकसंख्येपैकीं $\frac{7}{8}$ लोक शेतकीवर निर्वाह करीत होते.

---

## अमेरिकेंतील व्यवसायसंबंधीं युद्ध.

राजकीय युद्धाबरोबरच अमेरिकेंत व्यवसायसंबंधीं युद्धही उपस्थित झालें. एकाएकीं मोठ्या झपाट्यानें तेथील

व्यवसायाची स्थिति पालटली. राजकीय युद्ध कित्येक वर्षें चालू होतें. ह्या दोन्ही बाजूंनीं हें महायुद्ध सुरू होतें. ह्या वेळेपर्यंत अमेरिकेच्या सर्व बंदरांचीं तोंडें इंग्लंडच्या जंगी जहाजांनीं बंद करून ठेविलीं होतीं. ह्यामुळें युरोपचा व्यापार अगदीं बंद झाला होता. हा वेळपर्यंत अमेरिका देश आपणास लागणाऱ्या आवश्यकीय वस्तूंबद्दल अगदीं निष्काळजी होता. त्याचा सर्व भार युरोपच्या कर्तबगारीवर होता. परंतु जेव्हां निर्वाहास अत्यावश्यक असे पदार्थ न मिळाल्यामुळें अत्यंत त्रास होऊं लागला, तेव्हां त्याला कळून चुकलें कीं, आपल्या देशाच्या व्यवसायाची उन्नति केल्याखेरीज कोणताही देश स्वतंत्र होऊं शकत नाहीं. ह्या प्रकारामुळें अमेरिकनांस स्वावलंबनाचा खासा धडा मिळाला. त्यांना जेव्हां ते पदार्थ परदेशांतून मिळेनात, तेव्हां त्यांना ते आपल्या देशांतच बनवावे लागले. त्या वेळीं एकाएकीं अनेक प्रकारचे कारखाने उघडले गेले. त्यामुळें सर्व देश-भर औद्योगिक चळवळीची जंगी लाट उसळली; व राज-कीय स्वातंत्र्याबरोबरच व्यवसायिक स्वातंत्र्याची किती महति आहे ह्याची मनोमय साक्ष त्यांना पटली. देश स्वतंत्र होतांच परदेशांतून येणाऱ्या मालावर जबर कर बसविण्यांत आले आणि स्वदेशांतील कारखान्यांस अनेक प्रकारच्या सवलती देण्यांत आल्या. इ. स. १७८६ मध्यें परदेशांतून येणाऱ्या मालावर कर घेण्यासंबंधीं कायदा बनला. शेतकीचीं व इतर व्यवसायोपयोगाचीं यंत्रें बन-णारांस सभा, सोसायिट्या आणि सरकार यांच्याकडून

मोठमोठीं पारितोषकें दिलीं जाऊं लागलीं. ह्या पारितोषकांच्या लोभानें युरोपांतील मोठमोठे कारागीर तेथें जाऊन राहूं लागले. अशा प्रकारें इंग्लंडांतील "साम्युअल स्लेटर" नांवाच्या कारागिरानें द्रव्यार्जनाच्या लालसेनें अमेरिकेंत जाऊन 'ऱ्होडस आयलंड' नामक प्रदेशांत 'पाटकेट' शहरीं कापडाचा मोठा कारखाना उघडला. हा अमेरिकेंतील कापडाचा पहिलाच कारखाना होय.

इ. स. १८१२ मध्यें इंग्रजांबरोबर पुनः युद्ध सुरू झालें. ह्या वेळींही युरोपशीं चालणारा व्यापार पुनः बंद झाला. त्यानें अमेरिकनांना आपल्या व्यवसायाची उन्नति करण्याची संधि पुनः प्राप्त झाली. आणि पूर्वींचा त्यांचा उत्साह द्विगुणित झाला. ह्यामुळें इ. स. १८०६ पासून १८१५ पर्यंत अमेरिकेच्या व्यवसायाची पुष्कळच उन्नति झाली. इ. स. १८०४ मध्यें कापडाच्या केवळ चार गिरण्या चालू होत्या. परंतु इ. स. १८०७ मध्यें त्या पंधरा झाल्या. इ. स. १८११ मध्यें त्या ८१ वर होऊन त्यांत चार हजारांवर माणसें काम करीत होतीं. इ. स. १८१५ मध्यें ७६,००० माणसें काम करीत असून त्यांना प्रतिवर्षी ४,५०,००,००० रुपये मजुरी वांटली जात होती. इंग्लंडशीं तह होऊन सर्व व्यवहार पूर्ववत् चालू होतांच अमेरिकेच्या नवीन व्यवसायाला इंग्लंडच्या जुन्या व्यवसायाशीं टक्कर द्यावी लागली. प्रारंभीं कोणत्याही कारखान्यांतून उत्तम माल निघून तो स्वस्त दरानें

देतां येणें अशक्य असतें. यामुळें अमेरिकेच्या व्यवसायाला इंग्लंडच्या व्यवसायाशीं बरोबरी करतां येणें शक्य नव्हतें. ह्मणून आपल्या कारखान्यांचे रक्षणाकरितां अमेरिकन सरकारनें परदेशी मालावर जबर कर बसविला व आपल्या व्यवसायांकुराचें रक्षण केलें. देशांत व्यवसायाची वाढ होतांच मजुरांची मजुरीही वाढली, त्यांनीं आपल्या मंडळ्या व पंचायती स्थापन केल्या. त्यांची दशा सुधारण्याकरितां सुशिक्षित सुधारक नेते पुढें सरसावले आणि गोरे मजूर व काळे गुलाम यांचा कैवार घेऊन त्यांनीं जंगी चळवळ सुरू केली. कारखान्यांजवळ मोठमोठीं शहरें वसूं लागलीं आणि अधिक मजुरीच्या लोभानें इ. स. १८४५ नंतर यूरोपातून हजारों मजूर तेथें जाऊन राहूं लागले. एकोणिसाव्या शतकाच्या मध्य कालापर्यंत व्यवसायसंबंधीं झगडा पूर्णतेस पोहोंचला होता, व आधुनिक व्यवसाय पूर्णपणें पूर्णतेस गेला होता.

अशाप्रकारें व्यवसायासंबंधीं झगडा जेव्हां इंग्लंडमध्यें उपस्थित झाला होता, तेव्हां घरामध्यें काम करणारांचीं कामें कारखाने उघडले गेल्यामुळें बंद झालीं होतीं. त्यामुळें मोठा हाहा:कार उडून गेला होता. कां कीं, इंग्लंडमध्यें अशीं हजारों घरें होतीं कीं, त्यांच्याजवळ लहान लहान यंत्रें किंवा चरकें होतीं त्यांच्या द्वारें तीं नानाप्रकारच्या वस्तू बनवून त्यांवर आपला उदरनिर्वाह करीत. मोठमोठ्या गिरण्यांच्या द्वारें कारखाने सुरू होतांच हे घरगुती धंदे

एकदम बंद पडले. परंतु अमेरिकेमध्यें कारखाने उघडले तेव्हां हे घरगुती धंदे विशेष प्रमाणावर चालत नव्हते. यामुळें तेथें ही व्यवसायोन्नतीची लाट उसळून कारखान्यांचा प्रादुर्भाव झाल्यामुळें लोकांवर संकटें तर आलीं नाहींतच पण उलट त्यांना त्यापासून अत्यंत सुख लाधलें. लोकांच्या उपजीविकेप्रीत्यर्थ नानाप्रकारचे नूतन मार्ग निर्माण झाले. लोकांना आपल्या प्रात्यहिक जीवनक्रमाकरितां आवश्यक असणाऱ्या वस्तू सुगमतापूर्वक मिळूं लागल्या व देशांतील धन देशांतच राहूं लागलें; त्यामुळें देश समृद्ध झाला. लोकांचें उत्पन्न वाढलें व मजूरांची मजूरीही वाढली. त्यामुळें सर्व देश समृद्ध होऊन त्याला सुवर्णभूमि हें अन्वर्थक नांव प्राप्त झालें.

——:×:——

## शेतीची वाढ.



देशाच्या व्यवसायाशीं शेतकीचा निकट संबंध असतो ह्मणून येथें अमेरिकेच्या शेतीविषयीं थोडें वर्णन करणें जरूर आहे. इंग्लंडमध्यें जेव्हां कारखान्यांची वाढ विशेष प्रमाणांत होऊं लागली तेव्हां शेतकरी लहान लहान शेती मोडून शहरांत जाऊन कारखान्यांतून नोकरी करूं लागले. ह्यामुळें त्या देशांतील धनिकांनीं तीं लहान लहान शेतें खरेदी केलीं व आपण बडे जमीनदार बनले आणि त्या जमीनी लोकांना खंडानें देऊं लागले. परंतु अमेरिकेंत तसें झालें नाहीं.

कारखाने उघडले गेल्यामुळें त्या देशातील कांहीं शेतकऱ्यांनीं शेती सोडून कारखान्यांत जाऊन नोकरी धरली; परंतु तेथें जमीनदारीची पद्धति प्रचलित होऊं शकली नाहीं. तेथें शेतकरी हाच आपल्या शेताचा मालक होतो. शेतकी-संबंधीं नवीन नवीन सुधारणा होऊन शेतकऱ्यांना लाभही अधिक होऊं लागला ह्यामुळें शेतकऱ्यांची संख्या देशांत कमी होण्याचें बाजूस राहून ती विलक्षण प्रमाणांत वाढली. त्याचप्रमाणें पुष्कळशी पडीक जमीन लागवडीचेकामीं लागली. शेतकीचीं नवीन नवीन यंत्रें व अवजारें हीं निघाल्यामुळें जो फायदा झाला आहे त्याच्या लोभानें सुद्धां जमीनदारीचा प्रघात तेथें सुरू झाला नाहीं व आमच्या इकडील सावकाराप्रमाणें शेतकऱ्यास रुपये देऊन त्यांना गोत्यांत आणण्याची बुद्धि कोणास झाली नाहीं. ज्यांच्याजवळ मोठमोठ्या जमीनी आहेत असे शेतकरी तेथें क्वचितच सांपडतील. हल्लीं ह्या जमीनींची किंमत पुष्कळच वाढली आहे. कारण तीवर पुष्कळ मेहनत केली गेल्यामुळें त्या फारच सुपीक झाल्या आहेत. अशा प्रकारें अमेरिकेचे शेतकरी कोणाचेही कर्जदार न होतां स्वतंत्रतापूर्वक जमीनींचा उपभोग घेऊन आनंदपूर्वक आपला काळ कंठीत आहेत.



## व्यवसाय.

पूर्वीं अमेरिकेची जमीन अरण्यमय व नापीक होती, पण आतां ती चांगली सुपीक बनली आहे. शेतें जमीनदारांच्या

हातीं गेलेलीं नाहींत. अमेरिकेच्या कायद्यान्वयें जो शेती करतो तोच तिचा मालक होतो. ह्यामुळें मालक आणि कूळ या संबंधाचा प्रश्नच तेथें उत्पन्न होऊं शकत नाहीं. व्यवसायाच्या बाबतींत कालानुक्रमानें यांतही मोठमोठे फेर-फार झाले आहेत. जसजशी देशाच्या व्यवसायाची वृद्धि झाली, तसतशी त्याच्या स्वरूपाची स्थितीही पालटली. आतां कोणताही व्यवसाय सुरू करावयाचा ह्मणजे मौल्य-वान् यंत्रें व विपुल भांडवल यांची आवश्यकता असते. इ. स. १८५० मध्यें प्रत्येक मजूराकरितां कारखान्यांत १६६८ रुपये यांत्रिक सामानाकरितां लागत; परंतु तेच इ. स १९०० मध्यें प्रत्येक मजूराकरितां ५५५० रुपये लागूं लागले व आतां तर तें प्रमाण दहा हजारां जवळ जवळ पोहोंचलें आहे. दुसरी गोष्ट अशी कीं, आतां व्यव-सायाची संख्या अगदीं बदलून गेली आहे. पूर्वीं लोक आपापल्या घरांत जरूरीच्या वस्तू बनवीत. आतां त्या घरगुती कारखान्याच्या ठिकाणीं मोठमोठे कारखाने किंवा कार्पोरेशन उघडले गेले आहेत. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं कार्पोरेशन केवळ व्यांका चालविण्याकरितां होत असत. व्यवसायाकरितां कार्पोरेशन असणें हें तेव्हां कोणी जाणतही नव्हतें. इ. स. १९०५ मध्यें कार्पोरेशनच्या मोठमोठ्या कारखान्यामध्यें देशांतील मजूरांच्या लोकसंख्येंतील शेंकडा ७०$\frac{१}{२}$ लोक यांत काम करीत होते. आणि देशांत उत्पन्न होणाऱ्या मालापैकीं शेंकडा ७३$\frac{३}{४}$ माल ह्या कार-खान्यांत तयार होत होता.

ह्या संस्थामध्यें अशा प्रकारें परिवर्तन झाल्यामुळें कारखान्याचे धनिक मालक आणि यंत्रें चालविणारे मजूर ह्यांच्या पारस्परिक वर्तनांतही पुष्कळ फरक पडला. त्यामुळें धनिक आणि मजूर ह्यांमध्यें वैरभाव उत्पन्न झाला. ह्यामुळें व्यवसायसंबंधीं संस्थांच्या नियमनाचा अधिकारही बहुतेक थोड्याच लोकांच्या हातीं आला. त्या देशांतील कायद्यान्वयें कारखान्यांत थोडे हिस्से घेणारांचा कारखान्याच्या नियमनामध्यें कांहींच अधिकार नाहीं असें ठरविण्यांत आलें आहे. यामुळें ज्या लोकांचे कारखान्यांत अधिक हिस्से असतात, तेच आपल्या मर्जीप्रमाणें कारखान्यांची व्यवस्था ठेवितात. ह्या व्यवस्थेनें मालक आणि मजूर यांमध्यें व्यवसाय आणि वाणिज्यसंबंधीं खरा प्रेमभाव उत्पन्न न होतां, ह्या प्रचंड कार्पोरेशनाच्या योगानें त्यांच्या मूठभर संचालकांस सामायिक भांडवलाचा मनःपूत व्यवहार करण्यास सांपडत असल्यामुळें व्यर्थ द्वेषाग्नी मात्र पसरतो. अशा प्रकारें तेथें ह्या प्रचंड कारखान्यापासून देशाला विपुल लाभ होत असला तरी ह्या विवक्षित लोकांच्या अनियंत्रित कारभारामुळें हानीच पोहोंचत आहे.

असे हे प्रचंड कारखाने अस्तित्वांत येतात याला कित्येक कारणें आहेत. तथापि त्यांतील विशेष महत्त्वाचें कारण असें आहे कीं, तेथें कारखान्या-कारखान्यामध्यें चढाओढीच्या शर्यती किंवा व्यवसाययुद्धें चालतात. ज्या कारखान्यांतील माल सर्वांत अधिक स्वस्त व ज्यांचा खप

विशेष होतो, त्याच कारखान्यांतील मालाची चहा होते. तोच माल व्यापारीवर्ग खरेदी करतो. जे कारखाने या अहमहमिकेंत यशस्वी होतात, तेच जीवंत राहातात. जे यांत नामोहरम होतात, ते अल्पकाळ टिकून पंचत्वाप्रत पावतात. जे कारखाने जीवंत राहिलेले असतात, ते सम-यानुसारें असल्या व्यवसायांत निपुणता मिळवून दृढ होतात व कालांतरानें तेच संपन्न होऊन प्रचंड स्वरूपानें विलसूं लागतात. इ. स. १९०० व १९०५ यांमध्यें कारखान्यांची संख्या केवळ ४$\frac{१}{५}$ नीं वाढली; तथापि उत्पन्न शेंकडा ४१$\frac{३}{१०}$ नें वाढलें, व त्यापासून निघणाऱ्या मालाचें प्रमाण शेंकडा २६$\frac{७}{१०}$ नें वृद्धिंगत झालें. अमेरिकेंतील मुख्य मुख्य व्यवसायसंबंधीं कारखान्यांची संख्या इ स. १८८० ते १९०५ च्या दरम्यानच्या काळांत १९४३ ची ६४८ झाली. पण ह्या कारखान्यांच्या उत्पन्नाचें प्रमाण वाढलें. ह्मणजे पूर्वी जे १,८६,२९,००४ रुपयांचें उत्पन्न होत असे तें आतां ५९,०२,२२,१०० झालें! ह्या कार-न्यांतून पूर्वी ३९,५८० मनुष्यें काम करून तीं २०,५६, २१,४५८ रुपये किंमतीचा माल तयार करीत होतीं तर आतां ४७,३९४ मनुष्यें काम करून ३३,६०,२२,०३२ रुपये किंमतीचा माल तयार करूं लागलीं. ज्यांची वाढ चांगलीशी झालेली नाहीं असे कांहीं कारखाने तेथें आहेत; परंतु ते वाणिज्य व्यवसायात्मक नाहींत. अमेरिकेच्या ह्या प्रचंड कारखान्यांनीं जगाच्या व्यवसायांत प्रगति करून अग्रेसरत्व पटकावलें आहे. ह्या प्रचंड कारखान्यांचें प्रमाण इतर सर्व कारखान्यांच्या मानानें पहातां शेंकडा १ आहे.

परंतु त्यांत उत्पन्न होणाऱ्या मालाचें प्रमाण देशांत उत्पन्न होणाऱ्या सर्व मालाच्या मानानें शेंकडा ४० आहे. देशांतील $\frac{3}{4}$ मजूरवर्ग त्यांच्या द्वारें पोसला जातो.

मागें वर्णन केल्याप्रमाणें अमेरिकेंत प्रचंड कारखाने असून ते संघटित पद्धतीवर चालविले जातात. वाणिज्य व्यवसायाशीं ज्या कारखान्यांचा निकटसंबंध आहे असे कारखाने एक जुटीनें काम करितात, त्यामुळें पुष्कळच फायदा होतो. उदाहरणार्थ अमेरिकेंतील एका प्रचंड लोखंडाच्या कारखान्यामध्यें काम करणाऱ्या कारखान्यांचीं नांवें येथें दाखल करतों. ( १ ) धी अमेरिकन ब्रिज कंपनी ( २ ) धी अमेरिकन शीट स्टील कंपनी ( ३ ) धी अमेरिकन स्टील हूप कंपनी ( ४ ) धी अमेरिकन स्टील अँड वायर कंपनी ( ५ ) धी अमेरिकन टिन प्लेट कंपनी ( ६ ) धी फिडिरल स्टील कंपनी ( ७ ) धी लेक सुपीरियर कन्सालिडेटेड आयर्न माइन्स ( ८ ) धी न्याशनल स्टील कंपनी ( ९ ) धी न्याशनल टयूब कंपनी आणि ( १० ) धी कार्नेगी स्टील कंपनी, यांतील शेवटची 'धी कार्नेगी स्टील कंपनी' आपल्या कारखान्याकरतां लागणारें कच्चें लोखंड खाणींतून काढते. तें कारखान्यापर्यंत आणण्याकरितां तिच्या स्वतःच्या मालकीचे मोठमोठे स्टीमर आहेत. ह्या कंपनीच्या स्वतःच्या मालकीच्या अनेक रेल्वेलायनी आहेत. ह्या साधनांनीं स्वतंत्रतापूर्वक कच्चें लोखंड आपल्या कारखान्यांत आणून त्यापासून ती कंपनी नानाप्रकारच्या वस्तू बनवून आपल्या देशांत विकते व बाहेरदेशीं रवाना करते.

——:*:——

# रेलवे आणि स्टीमर.

अशा प्रकारें लहान लहान कारखाने संघटित्वाच्या पायावर एकत्र करून त्यांचे मोठमोठे विराट् कारखाने बनविले तरी त्यांच्यामधील स्पर्धा व व्यवसायिक युद्धें हीं लवमात्रही कमी झालीं नाहींत. ह्या व्यवस्थेमुळें सर्व कारभार अल्पसंख्यांक शक्तिशाली लोकांच्या हातीं गेला, यामुळें तर हें युद्ध विशेषच भयंकर झालें. कां कीं, प्रतिस्पर्धी जास्त सामर्थ्यवान् झाले. परंतु रेलवे आणि स्टीमर इत्यादिकांच्या बाबतींत स्वतंत्र नियम प्रचलित आहेत. यामुळें हें व्यावसायिक युद्ध चालू होतें तरी रेलवे, स्टीमर वगैरेचें भाडें स्वस्त झालें नाहीं. उलट त्यांच्या कंपन्यांचे संघ स्थापन होतांच त्यांची शक्ति वाढली आणि त्यामुळें त्यांचें भाडें कमी न होतां थोडें वाढलेंच.

अमेरिकेंतील रेलवे, स्टीमर आणि सडका ह्यांचा इतिहास तीन भागांत विभक्त होतो. एक इ. स. १७९० पासून इ. स. १८१६ पर्यंत हा सडकांचा काल होता. या कालांत कांहीं सडका बनविण्यांत आल्या. त्यांच्यावरून मोठमोठ्या शहरांचें दळणवळण चाले. नंतर इ. स. १८३७ अखेरपर्यंत नद्या आणि कालवे यांचा काल होता. त्या कालांत हडसन, ओहायो आणि मिसिसिपी ह्यां नद्यांतून दळणवळण चालविण्याकरतां त्यांत स्टीमर घातले आणि एरी नदींतून एक मोठा कालवा काढून त्यांतूनही स्टीमर चालवूं लागले.

इ. स. १८४० पासून रेल्वेच्या प्रसाराचा काळ सुरू झाला व तो आजतागायत जारीनें सुरू झाला आहे. ह्या विवेचनावरून इ. स. १७९० पूर्वी कालवे बनले नव्हते किंवा आतां सडका होत नाहींत असा अर्थ घ्यावयाचा नाहीं, तर या वर्गीकरणावरून भिन्न भिन्न काळीं तेथील रहिवाशांचें लक्ष कोणकोणत्या Transportation facilities वस्तूंकडे होतें. तें दाखविलें आहे.

रेल्वे प्रसाराच्या काळाचेही तीन भाग होतात. इ. स. १८३० मध्यें प्रथम बाल्टिमोर व ओहावो नांवाच्या रेल्वेलायनी बनल्या, ह्या वेळीं व इ. स. १८४० मध्यें कांहीं लहान लहान रेल्वे लायनी, नद्या व कालवे ह्यांपर्यंत पोहोंचविण्याकरितां बनविण्यांत आल्या. आणि पूर्वीच्या लायनीस दुसऱ्या लहान लहान लायनी जोडून मोठी लाईन बनविण्यांत आली. इ. स. १८६९ मध्यें " न्यूयॉर्क सेंट्रल ॲन्ड पेन्सिल व्हानिया " नांवाच्या रेल्वे कंपनीनें न्यूयॉर्क पासून थेट शिकागो पर्यंत रेल्वेलायनी बनवून त्यांवरून गाड्या चालविण्यास आरंभ केला. त्याच वेळीं " सेंट्रल युनियन पासिफिक रेल्वे " नांवाच्या रेल्वेच्या फांट्यानें पासिफिक महासागराच्या किनाऱ्याचा पूर्व-फाट्याशीं संयोग करण्यांत आला. अशा प्रकारें सर्व देशभर रेल्वेचें जाळें पसरून तो लोहशृंखलाबद्ध करण्यांत आला !

इ. स. १८७० पासून इ. स. १८९० पर्यंत तीन प्रकारें उन्नति झाली. एक या काळांत रेल्वेची वाढ झाली.

पूर्वी रेलवेचा विस्तार ५२००० मैल झाला होता तो या कालांत १६०००० मैल झाला. ह्मणजे शेंकडा २०० नें विस्तार अधिक झाला. दुसरी गोष्ट, न्यूयॉर्क पासून शिकागो-पर्यंत रेलवेचे अनेक फाटे झाल्यामुळें त्यामध्यें चुरस उत्पन्न झाली व एकमेकांवर चढाई करण्याच्या इराद्यानें त्यांनीं आपापले भाड्याचे दर शक्य तितके कमी केले. या व्यवस्थेनें लांब अंतरावरचा प्रवास करणारांस फार थोडें भाडें पडे; पण जवळ आसपास जाणारास जबर भाडें द्यावें लागे. कारण तेथें नेण्यास एकच गाडी असे. ह्या चुरशीपासून रेलवे कंपन्यांचें नुकसान होऊं लागलें; तेव्हां त्यांनीं आपसांत समेट करून सर्वानुमतें भाड्याचे दर कायम करून टाकले. त्यामुळें प्रवासी लोकांचें नुकसान होऊं लागलें तेव्हां त्यांनींही स्वहितरक्षणार्थ चळवळ करून सरकारकडून त्यासंबंधीं एक कायदा करवून रेलवे कंपन्यांचे भाड्याचे दर कमी करविले. त्याच वेळीं ह्मणजे इ. स. १८८७ मध्यें एक मोठें वाणिज्य कमीशन बसविण्यांत आलें. त्याच्या द्वारें वेळोवेळीं रेलवेच्या भाड्याचे दर कमी करविण्याचे व प्रजेच्या सुखासाठीं त्यांच्या व्यवस्थेंत सुधारणा करण्याचें ठरलें.

इ. स. १८९० पासून लहान लहान रेलवे कंपन्या एकत्र होऊं लागल्या. हा क्रम अद्यापही चालू आहे. या नवीन योजनेनें अमेरिकेंतील रेलवेंचा कारभार सात कंपन्यांच्या हातीं आला. ह्या कंपन्यांतील निवडक लोकांचें एक मंडळ आहे. त्याच्या द्वारें सर्व अमेरिकेंतील रेलवेची

व्यवस्था ठेविली जाते. तें आपल्या मर्जीप्रमाणें सर्व व्यवस्था करतें. पण तेथील प्रजापालनदक्ष सरकार त्यांची ती कारवाई चालूं न देतां त्यास मधून मधून आळा घालतें. इ. स. १९०६ त अमेरिकन सरकारनें एक कायदा करून त्या कायद्यानें रेलवेंच्या भाड्यांचे दर कायमचे ठरवून टाकले. त्यामुळें आतां कांहींएक भानगड उरलेली नाहीं.

---

## मजूरांतील चळवळ.

मोठमोठ्या कारखानदारांनीं प्रथम आपसांत चुरशीचे सामने करून आपले दर कसे उतरले व पुनः आपसांत समेट करून ते कसे वाढविले याचें वर्णन वर आलेंच आहे. असाच प्रकार मजूरांतही झाला. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं देशांतील मजूरांच्या पंचायती एकवटून त्यांचे संघ बनूं लागले.

इ. स. १८२५ ते इ. स. १८३७ च्या दरम्यान असे संघ बरेच वाढले. तेव्हां हे शहरोशहरीं असलेले संघ एकत्र करून राष्ट्रीय-संघ स्थापन करण्याचे व भिन्न भिन्न व्यवसाय करणाऱ्या लोकांचे संघ संकलित करून त्यांच्या त्यांच्या व्यवसायसंबंधीं विषयाची सर्वदेशीय–परिषद् स्थापण्याचे प्रयत्न सुरू झाले. प्रथमतः त्यांना या कामीं विशेष यश आलें नाहीं; परंतु इ. स. १८५० च्या पुढें त्यांच्या दीर्घप्रयत्नांस यश येऊन त्यांचीं सर्वदेशीय पंचायतें

स्थापन झाली. ह्यानंतर इ. स. १८६९ मध्यें एक महान् तेजस्वी " नाइट ऑफ लेबर " नांवाची मजुरांची जंगी सर्वदेशीय पंचायत स्थापन झाली. ही बरेच दिवसपर्यंत उत्तम प्रकारें टिकली. इ. स. १८९३ मध्यें तिचा जीर्णोद्धार होऊन तीस " अमेरिकन फेडरेशन ऑफ लेबर " ह्मणजे " अमेरिकेच्या मजुरांची महासभा " हें नांव प्राप्त झालें. ह्या महासभेंत अमेरिकेंतील बहुतेक पंचायतें समाविष्ट झाली. इ. स. १८९३ मध्यें ह्या महासभेच्या सभासदांची संख्या २,५०,००० होती. ती इ. स. १९०६ मध्यें १४,४४,२०० झाली. आतां तर ती संख्या पावकोटी जवळ जवळ गेली आहे. ह्यावरून गेल्या पंचवीस वर्षांत अमेरिकेंतील मजुरांमध्यें ऐक्याचें बीज कसें जोमानें रुजलें तें स्पष्ट होतें. ह्या महासभेच्या साह्यानें मजूरपक्ष मोठमोठीं कामें करतो. मजूर लोक आपल्या धन्याच्या अत्याचारास ह्या सभेच्या साह्यानें आळा घालतात व जरूर तर आपल्य[illegible] मानानें मजूरांचे दर ठरवून टाकतात. ह्या सभे[illegible] आणखी दुसऱ्या कांहीं सभा आहेत. त्या सर्वांमध्यें मिळून २३,[illegible]०० वर सभासद आहेत.

ह्या पंचायत सभांचा मुख्य उद्देश एकच व्यवसाय करणाऱ्या सर्व लोकांना संघटित करून त्या संघशक्तीच्या द्वारें विविध प्रकारचीं कार्यें करण्याचा असतो. उदाहरणार्थ, तेथें रेलवे ड्रायव्हरांची " ब्रदर्हुड आफ् लोकोमोटिव इंजिनीयर्स " नांवाची एक सभा आहे. तींत अमेरिकेंतील सर्व रेलवे ड्रायव्हर्सपैकीं शेंकडा ९० हून जास्त लोक सभासद आहेत.

ह्या सभेंत बहुमतानें जे ठराव पास होतात ते तिचे सर्व सभासद पाळतात. अशा प्रकारें समाजांतील शेंकडा ९० लोक एकाद्या कार्यास प्रवृत्त होतील, तर ते कोणत्याही संकटास न जुमानतां आपल्या कार्यांत यशस्वी होतील! ह्या सभेचे सभासद वाढविण्याकरितां व आपलीं कामें सुरळीत चालविण्याकरितां त्यांनीं असा नियम केला आहे कीं, जो कारागीर अगर मजूर ह्या सभेचा सभासद नसेल त्याच्याबरोबर ह्या सभेच्या कोणत्याही सभासदानें काम करूं नये. ह्या व्यवस्थेमुळें सर्वांनांच ह्या सभेचा सभासद व्हावें लागतें.

अशा प्रकारें मजूरवर्गांत प्रचंड सभा स्थापन होतांच कारखान्याच्या मालकांनींही त्याच्याविरुद्ध त्यांच्या प्रतिकारार्थ, आपल्या सभा स्थापन केल्या. अशा प्रकारच्या सभा तेथें कांहीं नवीन नाहींत. इ. स. १७८६ मध्यें अशा प्रकारची एक सभा तेथें चांभार लोकांनीं स्थापन केली होती. परंतु आतां ह्या सभा चिरस्थायी व कर्तृत्ववान् झाल्या आहेत. मजुरांच्या सभांचा प्रतिकार कारखान्यांचे मालक आपल्या सभांनीं करितात. मजुरांनीं संप केल्यास ते आपले कारखाने बंद करितात व त्यांना इतर कोणत्याही कारखान्यांत काम मिळणार नाहीं अशी व्यवस्था करतात. मजुरांच्या सभांप्रमाणें मालकांच्या सभेंत देशांतील लहान लहान सभा एका कार्याकरितां एकत्र होतात. उदाहरणार्थ, तेथील " सिटिझन इन्डस्ट्रियल असोसियन आफ् अमेरिका "

नांवाच्या सभेंत डिसेंबर १९०३ इसवीमध्यें ६० राष्ट्रीय सभा, ६६ प्रांतिक सभा व जिल्हासभा आणि ३३५ नागरिक कारखान्यांच्या मालकांच्या सभा एकवट झाल्या.

अशा प्रकारें मजूर व कारखान्यांचे मालक यांच्या सभांत झगडा होत असलेला पाहून त्याचें निर्मूलन करण्याकरितां सरकारनें मध्यस्ती करून मजूर, मालक व सरकारी ऑफीसर यांच्या मिश्रित सभा स्थापन केल्या. ह्या सभा मजुरांच्या मजुरीचे दर ठरवितात. आणि दुसऱ्या नाना प्रकारच्या झगड्यांचा फैसला करण्याचा प्रयत्न करतात. ह्या फैसल्या-बरहुकूम मजूर व मालक यांस वागण्यास भाग पाडण्याचें सामर्थ्य या सभेस जरी नाहीं तथापि सरकारदरबारीं हिच्या निकालाकडे विशेष लक्ष दिलें जातें.

—:o:—

# वाणिज्यसंबंधीं सरकारी व्यवस्था.



मजूर व मालक यांचेमधील झगड्यांत हात घालणें सरकारचें कर्तव्य होतें. तें कर्तव्य बजावण्याच्या इराद्यानें तेथील सरकारनें त्यांच्या कारभारांत हात घालून कांहीं व्यवस्था केली आहे. त्यासंबंधानें दोन शब्द लिहिणें जरूर आहे. अमेरिकेंत वसाहती झाल्यानंतर इंग्लीशसरकारनें इंग्लंडच्या कारखान्याकरितां तेथील लोकांकडून कच्चा माल पैदा करून घेण्यासाठीं कायदे वगैरे कसे केले तें मागें वर्णिलें आहेच. त्या मार्गानें त्यांना यशःप्राप्ति तर झाली

नाहींच. पण उलट ते कायदे आपल्या स्वातंत्र्यास आळा घालणारे अतएव त्याज्य आहेत, असें ठरवून त्यांनीं तद्विरुद्ध मोठी चळवळ सुरू केली. ती चळवळ विशेष भडकून तिचेंच पर्यवसान युद्धांत झालें. अमेरिकेनें स्वातंत्र्यार्थ इंग्लंडशीं युद्ध आरंभिलें—त्यांत अमेरिकनांची मनोकामना पूर्णपणें सफल झाली. अमेरिका स्वतंत्र झाली. देश स्वतंत्र होतांच प्रत्येक व्यक्तीसही स्वातंत्र्य मिळालें. त्यामुळें कोणासही आपलेकरितां दुसऱ्यास तसदी न देतां स्वतः-करितां वाटेल तें करतां येऊं लागलें. विवक्षित वेतन घेऊन मजूर दिवसांतून वाटेल तितका वेळ काम करूं लागले व मालक थोड्याशा मजुरीवर त्यांचेकडून वाटेल तितका वेळ वाटेल तितकें काम, वाटेल त्या वेळीं मनमुराद घेऊं लागले. त्यास व्यक्तिस्वातंत्र्याच्या नवीन व्यवस्थेमुळें कोणतेंही कोर्ट आळा घालूं शकत नव्हतें, एखाद्या गरीब स्त्रीकडून किंवा मुलाकडून चोवीस तास काम चोपून घेऊन त्याला धड पोटापुरतीही मजुरी देण्यांत येत नसे. अशा रीतीनें अन्याया-तिरेक होऊं लागल्यामुळें सरकारास स्वस्थ बसवेना. त्यानें त्यांत आपलें मन घालण्याचा निश्चय केला. व त्यांच्या काम करण्याच्या वेळा निश्चित करण्याचें ठरविलें.

कारखान्यांच्या व्यवस्थेंत इ. स. १८७६ पासून सर-कारनें आपला हात शिरकावण्यास सुरवात केली. नंतर वेळोवेळीं कांहीं कायदे करण्यांत आले. तेव्हांपासून आतां कारखानदार लोक मनःपूत वर्तन करीत नाहींत. आतां

त्यांना लहान मुलांकडून काम करवून घेतां येत नाहीं व स्त्रियांना ठराविक वेळेपेक्षां जास्त वेळ कामांत जखडून ठेवतां येत नाहीं. पूर्वीं आपला माल स्वस्त करतां येण्यासाठीं व अधिक नफा मिळविण्याच्या लोभानें खाण्यापिण्याच्या वस्तूंत व वस्त्रप्रावरणांत दुकानदार लोक कमी प्रतीचा माल मिसळून ग्राहकांस फसवीत असत; परंतु आतां त्याचा प्रतिकार करण्यासाठीं कायदा बनविण्यांत आला आहे. त्या अन्वयें तसें वर्तन करणाऱ्यास कडक शासन होतें. आतां कारखानेही पूर्वींप्रमाणें घाणेरडे असत नाहींत ते चांगले स्वच्छ ठेविले पाहिजेत, व मजुरांना विश्रांति घेतां येण्यास अवश्य अशीं उपकरणें तेथें असलीं पाहिजेत; असा नियम करण्यांत आला आहे. व त्या गोष्टीवर सरकारचा मोठा कटाक्ष आहे. शिवाय सध्यां तेथील मोठमोठ्या कारखान्यांतून हास्पिटलें व कामकरी लोकांच्या मुलां-मुलींकरतां दिवसाच्या शाळा व खास कामकरी लोकांकरतां रात्रीच्या शाळाही आहेत.

अशा प्रकारें कारखान्यांच्या अधिकारांत हात घालण्यांत सरकारचा उद्देश इतकाच कीं, कारखान्यांची सुधारणा व्हावी व त्याबरोबरच मजुरास सुस्थिति प्राप्त व्हावी व कोणी अत्याचारी व्यापाऱ्यानें आपल्या ग्राहकांस अधिक फायद्याच्या लोभानें मालाबरोबर विष कालवून देऊं नये अथवा माल स्वस्त करण्याच्या इराद्यानें असहाय बायका-मुलांस अल्प मजूरीवर अधिक काम करण्यास भाग पाडूं नये.

अशा प्रकारें अमेरिकेंतील व्यवसाय आणि त्यांचा विकास यांचा इतिहास आहे.

अमेरिका ही सुपीक व अमूल्य खनिज संपत्तीनें परिपूर्ण अशी भूमि आहे. तींत मोठमोठ्या नद्या, निर्झर व कालवे; मोठमोठे विशाल पर्वत व अफाट मैदानें हीं आहेत. तेथें सर्व प्रकारची हवा व ऋतु आहेत. तेथील लोक स्वातंत्र्य-प्रीय, उत्साही, दृढनिश्चयी व कार्यनिपुण आहेत. तेथील शासनपद्धति प्रजासत्ताक आहे. तेथें परदेशी मालावर जबर कर लादला जातो. तेथील मजूर स्वतंत्र, शिक्षित, संपन्न व संस्थायुक्त आहेत. तेथें सरकाराकडून कारखाने उघडण्यास व ते चालविण्यास उत्तेजन आणि साह्य मिळतें. त्यामुळें तेथें मोठमोठे विशाल व संपन्न कारखाने चालतात. त्यांतील एकच व्यवसाय करणारे कारखाने एकत्रित होऊन आपल्या कारखान्यांचें एकसारखेंच नियमन करतात व एकमेकांच्या अनुभवाचा फायदा परस्परांस देऊन उत्कृष्ट माल निर्माण करतात. असा अमेरिकेंतील व्यवसाय व त्यांचा विकास यांचा मनोरंजक वृत्तांत वाचकांपुढें ठेविला आहे. त्याचें विशेष ज्ञान होण्याकरितां आणखी कांहीं माहिती पुढें सांगावयाची आहे.



# धी युनायटेड स्टेट्स स्टील कार्पोरेशन.

## ( अमेरिकेंतील लोखंडाच्या कारखान्यांची प्रचंड माहिती. )

अमेरिकेंत मूळारंभीं इ. स. १८४६ मध्यें केन्टकी नामक शहरांत पिट्सबर्ग येथील केली नांवाच्या एका मनुष्यानें लोखंडाचा एक लहानसा कारखाना उघडला. इ. स. १८५६ मध्यें इंग्लंडांतील बिसेमर नामक एका विद्वान् गृहस्थानें लोखंड तयार करण्याची मोठी नामी युक्ति शोधून काढली. त्यामुळें लोखंडाच्या व्यवसायांत मोठें परिवर्तन घडून आलें. त्या पद्धतीवर अमेरिकेंत कांहीं ठिकाणीं लहान लहान कारखाने उघडले गेले; परंतु ते यशस्वी झाले नाहींत. कारण त्या वेळीं अमेरिकेंत इंग्लंडांतील लोखंड जाऊन तें अति स्वस्त दरानें विकलें जात असे. म्हणून आपल्या देशांतील लोखंडाच्या व्यापारास उत्तेजन येण्याकरितां व परदेशी मालास आळा घालण्याकरितां इ. स. १८६१ मध्यें अमेरिकन सरकारनें परदेशी मालावर कर बसविला. या उपायानें अंदाजाप्रमाणें इच्छित हेतू तडीस गेला म्हणजे परदेशांतून लोखंड येण्याचें बंद झालें. तेव्हां अर्थातच त्या देशांतील जे लोखंडाचे कारखाने मृतावस्थेंत पडून होते, त्यांच्यांत चैतन्य उत्पन्न होऊन त्यांनीं आपलें काम मोठ्या धडाडीनें सुरू केलें. येथूनच अमेरिकेंतील लोखंडाच्या व्यवसायास आरंभ झाला. इ. स. १८७६ मध्यें उत्तर व

दक्षिण अमेरिकनामध्यें गुलामीच्या बाबतींत आपसांत तंटा उत्पन्न होऊन मोठें रणकंदन माजलें. युद्धामध्यें लोखंडाची अत्यंत आवश्यकता असते, यामुळें त्या वेळीं त्याची किंमत अतोनात वाढली. युद्धापूर्वी त्याची किंमत दर टनीं ५५ रुपये होती ती २२० रुपये झाली; ह्मणजे पूर्वींच्या चौपट किंमत झाली. ह्या आकस्मिक घटनेमुळें लोखंडाच्या लहान मोठ्या कारखान्यांस विलक्षण प्राप्ति झाली. त्यानें त्यांस नव-जीवन प्राप्त झालें. त्यांनीं आपलें पूर्वीचें रूप टाकून देऊन प्रचंड रूप धारण केलें. त्याच वेळीं कार्नेगीनें पिट्सबर्गमध्यें लोखंडाचा एक जंगी कारखाना उघडला, आणि सरकार व रेल्वे कंपन्या ह्यांस लागणाऱ्या लोखंडाचा पुरवठा करण्याचें त्यानें कंट्राक्ट घेतलें व त्याच्या व्यापाराची मोठी उन्नति केली. पाहतां पाहतां सर्व देशभर त्याचे कारखाने पसरले. इ. स. १८६० पासून इ. स. १९०० पर्यंत त्याच्या व्यापारास मंदी आली होती. त्याची मागणी फार कमी प्रमाणांत झाली. तथापि त्याच्या पैदाशीचें काम अव्याहत अगदीं जोरांत सुरू होतें; त्यामुळें लोखंडाचा भाव अगदीं उतरला. इ. स. १८६३ मध्यें लोखंडाचा व्यापार करणें हें अत्यंत धोक्याचें काम होतें. तेव्हां कित्येक कारखान्यांचीं दिवाळीं वाजून त्यांनीं आपला व्यवसाय बंद केला. कारखाने बंद पडण्याचा हा क्रम एकसारखा पांच वर्षेंपर्यंत चालू होता. त्या बंद पडणाऱ्या कारखान्यांचें स्थान देशांतील प्रचंड कारखा-

ऱ्यांनीं पटकाविलें. ह्या कारखान्यांस विलक्षण लाट सांपडली. त्यांनीं मृत्युपंथास लागलेले कारखाने अगदीं अल्प किंमतीस खरेदी घेऊन आपल्या वखारींत अगदीं खेंचून माल भरला. व तो ते भरपूर किंमत घेऊन विकूं लागले. इ. स. १८६८ पर्यंत लहान लहान कारखाने नष्ट होऊन ते मोठ्या कारखान्यांत मिसळले व ते प्रचंड रूपानें जगांत वावरूं लागले. पुढें एकाएकीं लोखंडाच्या मालास तेजी आली व मागणी विलक्षण प्रमाणानें वाढली. तेव्हां ह्या कारखान्यांनीं मालाचा पुरवठा करून विपुल नफा मिळविला.

इ स. १८६८ मध्यें लोखंडी मालास ही जी तेजी आली अर्थात् विलक्षण प्रमाणांत मागणी आली व त्यामुळें त्या वेळीं मुठींत जीव धरून राहिलेल्या कारखान्यांस जी अपूर्व किफायत झाली, त्याची दोन तीन वर्षांपूर्वीं कोणास कल्पनाही नव्हती. "लोखंडाचा राजा" या शब्दांनीं गौरवपूर्वक संबोधिले जाणारे लोखंडी मालाचे प्रख्यात व्यापारी कार्नेगी ह्यांचें असें ह्मणणें आहे कीं, लोखंडाचा व्यापार हा त्या व्यवसायांत पडलेल्यास मोठा संपत्तिशाली तरी बनवितो किंवा अगदीं अकिंचन तरी करतो. ह्याचें कारण लोखंड तयार करण्यास विपुल धनाची आवश्यकता लागते यामुळें त्याची पैदास एकदम अति जास्त किंवा अगदीं कमी प्रमाणांत होत नाहीं. शिवाय लोखंड ही कांहीं खाण्याची वस्तु नाहीं किंवा परम आवश्यकीय अशीही वस्तु नाहीं. ह्मणून त्याची मागणी प्रसंगवशात् जास्त-कमी होते. अर्था-

तच मागणी व मालाची उपज हीं बरोबरच होत नसल्या-मुळें त्याचा भाव एकदम कमजास्त होतो व लाभ-हानि हीं एकाएकीं घडून येतात.

इ. स. १८६८ मध्यें लोखंडाच्या मागणीची जी लाट उसळली तींत अमेरिकेंतील लोखंडाच्या व्यापाऱ्यांनीं विपुल फायदा कमावून ते संपत्तिवान् बनले व ते पुढेंही चांगला फायदा कमावूं लागले. तेव्हां हा व्यवसाय मोठमोठ्या धनाढ्य कंपन्याच करीत होत्या. त्यांना चांगला फायदा होतो असें पाहून त्यांचे शेअरही भराभर खपूं लागले. यामुळें त्या कंपन्यांना जास्तच स्फुरण येऊन त्या प्रचंड धनसंचय करून लोखंडाचे मोठमोठे कारखाने उघडूं लागल्या व रेल्वेचा विस्तार विशेष प्रमाणांत वाढवूं लागल्या.

ह्या वेळीं लोखंडाच्या मोठमोठ्या कारखान्यांनीं कार्नेगीच्या अध्यक्षत्वाखालीं आपली मोठी उन्नति करून घेतली. ह्या वेळीं त्या कारखान्यांनां जो नफा होई तो सर्व कारखान्याच्या भांडवलांतच घालण्यांत येई. त्यामुळें त्यांची फारच उन्नति झाली. आपल्या ज्ञानानें व अनुभवानें कार्नेगीनें ह्या कारखान्यांना जगांतील इतर कारखान्यांहून स्वस्त आणि श्रेष्ठ प्रतीच्या मालाची पैदास करणारे बन-विले. ह्या कारखान्यांकडून चालविले जाणारे दगडी-कोळशाचे कांहीं कारखाने होते; लोखंड काढण्याच्या कांहीं खाणी होत्या; नद्या व कालवे ह्यांतून चालणारीं कांहीं स्टीमरें होतीं; आणि ह्या कारखान्यांच्या मालकीच्या

मोठमोठ्या रेलवेलायनीही होत्या. ह्या कंपन्या आपल्या खाणींतून अशुद्ध लोखंड काढून आपल्या स्टीमरांतून व रेलवेंतून तें कारखान्यांत वाहून आणून त्यांच्या आपल्याच कोळशानें नानाप्रकारच्या वस्तु बनवीत व आपल्याच रेलवेनें त्या बाजारांत नेऊन विकीत. ह्यामुळें ह्या कारखान्यांतून निघालेला माल सर्वांहून स्वस्त आणि उत्कृष्ट असे, ह्मणूनच त्यांचा खपही सर्वांत जास्त होई. अर्थातच हे कारखाने यशस्वी होऊन कार्नेगी कंपनी अत्यंत धनिक व बलाढ्य झाली परंतु; ही कंपनी सर्वस्वी स्वतंत्र नव्हती; कां कीं, लोखंडी मालाचा व्यापार करणाऱ्या दुसऱ्या कंपन्या ह्या कंपनीपासून सर्व प्रकारचा तयार माल घाऊक विकत घेऊन तो किरकोळ विकण्याचें काम करीत. व कांहीं अर्धवट तयार माल खरेदी घेऊन त्यापासून दुसऱ्या कांहीं वस्तू बनवून त्या विकीत.

लोखंडी मालाचा व्यवसाय करणाऱ्या ह्या लहान लहान कंपन्या ह्मणजे कार्नेगी कंपनीसारख्यांच्या कारखान्यांतून माल खरेदी करून त्यापासून निरनिराळ्या वस्तू बनवीत. त्या आपल्या परतंत्र अवस्थेनें संतुष्ट नव्हत्या. त्यांचीही इच्छा कच्च्या मालापासून आपण स्वतःच सर्व माल बनवावा व दुसऱ्यास कांहींएक फायदा होऊं न देतां आपणच सर्व नफा मिळवावा अशी होती ह्मणून त्या कंपन्याही लोखंड आणि दगडी कोळसा यांच्या खाणी खरेदी करण्याचा, स्टीमर आणि रेलवेलायनी बनविण्याचा व

मोठमोठे कारखाने उघडण्याचा विचार करूं लागल्या. ह्यानें कार्नेगी कंपनी व इतर मोठमोठ्या कंपन्या ह्यांची हानि होणार होती. ह्यामुळें लोखंडाच्या व्यापारांत मोठी खळबळ माजून राहिली. तेव्हां अमेरिकेंतील बुद्धिमान् व जबाबदार पुढाऱ्यांनीं विचार केला कीं, आतां ह्या कंपन्यामध्यें आपसांत भयंकर चुरस पैदा होऊन त्यानें लोखंडाच्या व्यापाराची भयंकर हानि होण्याचा संभव आहे. ह्मणून तो प्रसंग टाळण्याकरतां त्यांनीं सर्व कंपन्या मिळून लोखंडाचा व्यापार करणारी एकच प्रचंड कंपनी स्थापावी असा बेत केला. आणि त्याप्रमाणें प्रयत्न करून " धी युनायटेड स्टेट्स स्टील कार्पोरेशन " ह्मणून संयुक्त संस्थानाची एक प्रचंड कंपनी प्रस्थापित केली.

ही कंपनी प्रस्थापित करण्याच्या कामीं एक मोठी अडचण होती. ती अडचण ह्मणजे ही कंपनी स्थापन करून ती सुव्यवस्थित रीतीनें चालवील अशा मनुष्याची होय. अर्थातच हा मनुष्य मोठा दूरदर्शी, हुषार व अनुभवी असणें जरूर होतें. तसेंच ह्या प्रचंड व बिकट कार्यास हातीं धरण्यास, धनिक, औद्योगिक आणि कायदेपंडित मनुष्याची आवश्यकता होती. सुदैवेंकरून ह्या कामीं सर्व लोकांस मोठी आस्था वाटत होती, आणि तशी आस्था वाटणें साहजिकही होतें. कां कीं, ह्या वेळीं लोखंडाच्या व्यापारांत सर्वांचा थोडा-फार संबंध होताच. तेव्हां त्यांत हानि पोहोंचली असती तर सर्वांचेंच नुकसान झालें असतें.

ह्यामुळें ते लोक मोठ्या आस्थेनें ह्या कामाचा भार आपले शिरावर घेण्यास पुढें सरसावले. अमेरिकेंतील नवकोट नारायण मार्गननें ह्या कार्याचा सर्व भार आपले शिरावर घेण्याचा विडा उचलला. ह्या प्रचंड कंपनीच्या स्थापनेचा सर्व वृत्तांत गुप्त असून तो फार थोड्या लोकांस माहीत आहे. ह्या सर्व कारखान्यांस एक करण्यास फार वेळाची आवश्यकता नव्हती. कां कीं, ह्या कारखान्याची सर्व स्थिति ह्या मोठ्या कार्पोरेशनची स्थापना करणारास माहीत होती. प्रथमतः केवळ चार मोठमोठ्या कंपन्या एकत्र करण्याचा विचार होता; परंतु असें केल्यास बाकी शिल्लक राहिलेल्या कंपन्यांत पुनः झगडा माजेल ह्मणून आणखीहि कांहीं कंपन्या ह्यांत गोंवण्यांत आल्या.

ह्या कंपनीनें ज्यूजेर्सी प्रांतांत ता. २३ फेब्रुवारी १९०१ इसवीला आपली कंपनी रजिष्टर केली; परंतु पुनः ती व्यवस्था बदलून त्याच सालच्या एप्रील महिन्यांत ती पुनः नोंदण्यांत आली. तेव्हां तिचें भांडवल ३,३०,००,००,००० रुपयांचें करण्यांत आलें व कारणपरत्वें हें भांडवल वाढवावें लागल्यास तें वाढविण्याचा अधिकार कार्पोरेशनास देण्यांत आला.

मि. मार्गन हे न्यूयॉर्क शहरांतील प्रमुख व्यापारी होते. त्यांच्या ब्यांकेची गणना जगांतील मोठमोठ्या ब्यांकांमध्यें होते. तत्कालीन व्यापाऱ्यांतील यशस्वी व्यापाऱ्यांपैकीं ते एक होते. थोड्या वर्षांपूर्वी ते परलोकवासी झाले. ह्या प्रतिकुबेरा-

वरच ह्या कार्पोरेशनच्या धनसंचयाचें कार्य सोंपविण्यांत आलें. त्यांनीं त्याचे भाग करून ते विक्रीस मांडले. त्यापासून ७२,००,००,००० रुपये जमा झाले. ७,५०,००,००० रुपये संचालकांनीं दिले. याशिवाय मार्गनसाहेबांना व त्यांच्या ब्यांकेला भाग विक्री केल्याबद्दल कमीशन, जाहिरातीचा खर्च वगैरेबद्दल कांहीं रकम देण्यांत आली ती वेगळीच. त्या वेळीं एकट्या मार्गन साहेबांनाच त्यांच्या श्रमाच्या मोबदल्याबद्दल १३,८०,००,००० रुपये मिळाले ! वास्तविक पाहिलें तर असें प्रचंड कार्य इतक्या उत्कृष्ट तऱ्हेनें बजावणाऱ्यास हा मोबदला ह्मणजे कांहींच नाहीं. ह्याशिवाय कार्नेगी कंपनींत जे हिस्से होते तेही ह्या कंपनीनें खरेदी घेतले. त्यांच्या किंमतीबद्दल कार्नेगीला १,६८,६०,००,००० रुपयांच्या किंमतीचे हिस्से ह्या कंपनींत मिळाले. वाचकहो, कसा चमत्कार आहे पहा ! एक अनाथ बालक ( कार्नेगी ) इ स. १८३५ मध्यें आपल्या आईबरोबर अमेरिकेंत मजुरी करण्याकरितां आला. तो आपल्या अक्कलहुशारीनें आणि बाहुबलानें दीड अब्जांहून अधिक रुपयाचा मालक होऊन बसला ! अस्तु. ह्याशिवाय आणखी सात कंपन्या १,५६,६०,००,००० रुपयांस खरेदी घेण्यांत आल्या. ह्या प्रचंड कार्पोरेशनच्या हातीं पहिल्याच वर्षी १,३१,९५,५३,८४०॥ डॉलरचें भांडवल होतें.

खालीं दिलेल्या आंकड्यांवरून प्रारंभीं ह्या कार्पोरेशन-

जवळ किती धनसंचय होता याचें चांगलें अनुमान होणार आहे. ह्यानें आरंभींच खालीं लिहिलेले कारखाने वगैरे खरेदी केले:—

२१३ भिन्न भिन्न तऱ्हेचे लोखंडाचे कारखाने; ४१ लोखंडाच्या खाणी, १००० मैलपर्यंतची रेलवे कंपनी, ११२ मोठमोठ्या कालव्यातून चालणारे स्टीमर, १८ ब्लैस्ट फर्नेस्ट लोखंड गाळण्याच्या भट्ट्या, ५७,००० एकर लांकडाचा कोळसा बनविण्याचा प्रदेश, ५०,००० एकर दगडी कोळशाचा प्रदेश आणि सुपीरियर कालव्यांच्या कांठी असणाऱ्या लोखंडाच्या मोठमोठ्या खाणी. ह्या खाणी अत्यंत महत्वाच्या होत्या. त्यांतून १५,००,००,००० टन लोखंड मिळण्यासारखें होतें.

पुढें सवडीसवडीनें ह्या कार्पोरेशननें पुढील कंपन्या खरेदी केल्या.

१ शेल्बी ट्यूब कंपनी इ. स. १९०१ मध्यें.
२ युनियन स्टील ,, ,, १९०२ ,,
३ चेमंग आयर्न ,, ,, १९०३ ,,
४ केयटर्टन स्टील ,, ,, १९०४ ,,
५ हिल येथील लोखंडाची खाण ,, १९०७ ,,
६ टेनेसीकोल, आयर्न आणि रेलवे कंपनी ,, १९०७ ,,

हे कारखाने खरेदी करून शिवाय ह्या कार्पोरेशननें आपल्या नफ्याच्या पैशानें एक अगदीं नवीन प्रचंड कारखाना इंडियाना प्रदेशाच्या गहन अरण्यांत २२,५०,००,०००

रुपये भांडवल गुंतवून उभारला. ह्या ठिकाणीं इ. स. १९०८ सालीं कामास सुरवात झाली. मिनेसोटा प्रदेशांत डयूलथ गांवीं १३५० एकर जमीन खरेदी करून आणखी एक प्रचंड कारखाना उघडला. ह्या दोन कारखान्यांच्या स्थापनेनें लोखंडाच्या मागणीप्रमाणें पुरवठा करतां येऊं लागला.

इ. स. १९०३ मध्यें लोखंडाची मागणी कमी प्रमाणांत झाली. ह्यामुळें ह्या कार्पोरेशनला कांहीं जुने कारखाने मोडावे लागले. पुढें दुसऱ्याच वर्षीं ह्मणजे इ. स. १९०४ मध्यें ह्या कार्पोरेशननें लोखंडाचा तयार झालेला माल परदेशांत पाठविण्याची आपली एक शाखा काढली.

ह्या कार्पोरेशनला आरंभापासूनच मोठा फायदा होत आहे. कां कीं, ह्याच्या कारखान्यांची व्यवस्था फारच उत्कृष्ट असते. यामुळें या कार्पोरेशनची जगांत मोठी प्रशंसा झाली आहे. दिवसेंदिवस याची मोठ्या झपाट्यानें उन्नति होत आहे.

ह्या कार्पोरेशनचा संबंध आपल्या मजुरांशीं आतांपर्यंत फार चांगल्या रीतीनें चालूं आहे. कोणत्याहि प्रकारचा बेबनाव किंवा संप ह्याच्या कारखान्यांत अद्याप झालेला नाहीं. इ. स. १९०२ च्या अखेरीस ह्या कार्पोरेशननें एक नवीनच पद्धत सुरू केली. ती पद्धत ह्मणजे कंपनीच्या फायद्यांत मजुरांनांही भाग देण्याची होय. त्याप्रमाणें मजूरांना हिस्से देण्यांत आले. त्याचे सहा वर्ग ठरविण्यांत

आले. प्रत्येक वर्गांतील मजूराला त्याच्या मजुरीच्या मानानें प्रत्येक वर्षी कांहीं विवक्षित हिस्से मिळतात. ते बाजार-भावापेक्षां कमी किंमतीस त्यांना दिले जातात. एक हिस्सा एका मजुराकडे ५ वर्षेपर्यंत असला तर त्याबद्दल त्याला १५ रु० मिळतात. या योजनेनें असा परिणाम झाला कीं, २,१०,००० मजूर ह्या कार्पोरेशनच्या नफ्यातोट्याचे भागीदार बनले. त्यामुळें त्या लोकांना कार्पोरेशनच्या कामाची अत्यंत आस्था वाटूं लागली व ते आपल्या अधि-काऱ्यांशीं प्रेमळपणाचें वर्तन ठेवूं लागले.

ह्या कार्पोरेशनच्या ताब्यांत अनेक कारखाने आहेत. तरी त्या सर्वांची व्यवस्था पूर्वीप्रमाणेंच वेगवेगळी ठेविली जाते व मालाची खरेदी आणि विक्री ह्या वेगवेगळ्याच केल्या जातात. कार्पोरेशन हें त्यांच्यावर देखरेख ठेवतें व त्यांची आपसांत चुरस लागूं नये आणि त्यांनीं आपले भाव वाढवूं नयेत किंवा कमी करूं नयेत अशी व्यवस्था करतें. त्यांना कच्च्या मालाचा पुरवठा व पैशाची मदतही तेंच करितें.

अशा प्रकारें अमेरिकेंत व्यवसाय आणि व्यापार केला जात आहे. लोखंडाच्या ह्या प्रचंड कंपनीप्रमाणें दुसऱ्या वस्तू बनविणाऱ्याही पुष्कळ मोठमोठ्या कंपन्या तेथें आहेत.

आमच्या देशांत अमेरिकेप्रमाणें मोठमोठे कारखाने उघ-डले जातील आणि त्यांच्या रक्षणाकरितां परदेशांतून येणाऱ्या मालावर जबर कर लादला जाईल, ती वेळ भारत-

वर्षांच्या अत्यंत भाग्याची होय. कां कीं, असें झाल्या-शिवाय परदेशांतील जुन्या व अनुभवी कारखान्यांतून निघालेला माल आमच्या देशांत स्वस्त भावानें विकला जाऊन सांप्रतच्या स्थितीप्रमाणें नेहमींच येथें तयार झालेल्या मालाची हत्या करीत रहाणार. ही चालू परिस्थितीच कायम राहिली तर आमच्या देशाच्या व्यवसायाची उन्नति केव्हांही होऊं शकणार नाहीं हें उघड आहे.

—:o:—

## सुरक्षित अथवा स्वतंत्र व्यवसाय.

अमेरिकेंतील व्यवसायांचें वर्णन करीत असतां सुरक्षित व्यवसाय ह्मणजे काय? स्वतंत्र व्यवसाय ह्मणजे काय? त्यांपासून नफा-नुकसान काय? आणि तो कोणकोणत्या अवस्थेंत होतो, तें दाखविण्याचा प्रयत्न केला तर तो अप्रस्तुत होणार नाहीं असें वाटल्यावरून त्याविषयीं खालीं विवेचन करण्यांत येत आहे.

'सुरक्षित व्यवसाय' याचा अर्थ देशामध्यें तयार झालेल्या मालापेक्षां परदेशी माल स्वस्त विकला जाऊं नये ह्मणून त्यावर कर बसवून देशी मालाचें संरक्षण करणें; आणि 'स्वतंत्र व्यवसाय' याचा अर्थ कोणत्याहि परदेशी वस्तूवर कर न लादतां देशी व्यवसाय अगदीं स्वतंत्रपणें त्याशीं टक्कर देण्यास समर्थ होणें; असे अर्थ येथें गृहीत धरिले आहेत.

व्यवसायाच्या ह्या दोन अवस्थेचे निरनिराळे पक्षपाती आहेत आणि त्यांचे त्याविषयींचे विचारही भिन्न भिन्न आहेत. त्या विचारांचा ऊहापोह पुढें करण्यांत येत आहे.

## सुरक्षित व्यवसायाचा पक्ष.

( १ ) परदेशी माळावर कर बसवून देशाच्या व्यवसायाचें संरक्षण करावें असें प्रतिपादणाऱ्या पक्षाचें असें ह्मणणें आहे कीं, देशांतील व्यवसायाचें रक्षण केल्यानें पहिला मोठा महत्वाचा फायदा ह्मणजे त्यांत राष्ट्रीयत्वाचा प्रादुर्भाव होतो हा होय. देशी व्यापार देशाच्या सर्व प्रजेस एकत्रित करून त्यांच्यांत एकीचा संचार करतो. उलट पक्षीं, विदेशी व्यापार देशांत वैरभाव उत्पन्न करतो. अमेरिका स्वतंत्र झाल्यावर देशांत व्यापाराची वाढ चांगल्या प्रकारें होईल अशी तजवीज करण्यांत आली व त्याच्या रक्षणाकरितां सर्व परदेशी माळावर कर लादण्यांत आले. त्यानें तेथील उद्योगधंद्यांचें पुनरुज्जीवन होऊन त्यांची वाढ झाली. प्रारंभीं तर अमेरिकेंतील प्रत्येक स्वतंत्र प्रदेश आपल्या दुसऱ्या बांधवांपासून आपल्या व्यवसायांचें संरक्षण करण्याकरितां, त्यांच्या प्रदेशांत तयार झालेल्या माळावर कर लादी; परंतु सध्यां आपसांतील हे कर बंद केले असून आतां ते परदेशी माळावरच लाविले जात आहेत; ह्यामुळें अमेरिकेंतील सर्व वसाहतवाल्यांत प्रेमभाव उत्पन्न झाला असून दुसऱ्या देशाविरुद्ध आपल्या देशाविषयीं अभिमान जागृत झाला आहे व त्यानें त्यांच्या अंगीं राष्ट्रीयत्वाच्या

उदात्त भावनेचा संचार झाला आहे. अशा प्रकारें आर्थिक आणि व्यापारिक ऐक्य उत्पन्न झाल्यामुळें राजकीय ऐक्याचा अंकुर उत्पन्न झाला असून तो दिवसेंदिवस जोमानें फोंफा- वत आहे.

( २ ) देशी व्यापाराचें संरक्षण करणाऱ्या पक्षाचें म्हणणें आहे कीं, कोणत्याहि देशाच्या सरकारानें आपल्या देशाच्या प्राथमिक आणि नव्या व्यापाराला साह्य करणें अवश्य आहे. सरकाराकडून त्यांना तसें साह्य मिळालें तरच देशाच्या सांपत्तिक स्थितीची वाढ होईल व नाना- प्रकारचे उद्योगधंदे निघून त्यांनीं हजारों लोकांचें परिपोषण होईल. परदेशी मालावर जबर कर बसविण्यांत आल्यास आरंभीं देशाचें द्रव्यदृष्ट्या नुकसान होतें ही गोष्ट ते कबूल करितात; परंतु अशा प्रकारें परदेशी मालावर कर लावला नाहीं, तर देशी उद्योगधंद्याची व व्यापाराची वाढ होत नाहीं, अर्थात् त्यामुळें राष्ट्राभ्युदयही होत नाहीं.

अर्थशास्त्राचे जाडे पंडितही वरील विधानाची सत्यता कबूल करतात. एकादा व्यवसाय प्रारंभीं एकाद्या जिल्ह्यांत सुरू होऊन कालगतीनें तो चांगला वाढल्यास त्या जिल्ह्यास असा फायदा होतो कीं, त्या जिल्ह्यांत त्या व्यवसायांत निपुण असे कारागीर मिळतात व द्रव्याचाही पुरवठा होतो. ह्या कारणामुळेंच अमेरिकेंतील तयार होणाऱ्या घड्याळां- पैकीं शेंकडा ७० घड्याळें कानेक्टीकट शहरांत तयार होतात. ह्या शहरांतच इतकीं घड्याळें तयार होतात याचें

कारण तेथें त्या व्यवसायाचा आरंभापासूनच चांगला जम बसला आहे; हें होय.

( ३ ) एकाद्या देशांत जेव्हां युद्ध उपस्थित होतें तेव्हां त्याला आपल्या देशीं तयार होणाऱ्या मालापासून फार फायदा होतो. ज्या देशाच्या व्यवसायाची चांगली उन्नति झालेली असते तो देश युद्धाच्या कामीं चांगला तयार रहातो. आपल्या देशांत हत्यारांचे, दारुगोळ्यांचे व इतर युद्धोपयोगी सामानांचे कारखाने आहेत किंवा नाहींत तें पाहणें व त्यांत कांहीं न्यून असल्यास त्याची परिपूर्तता करणें हें देशांतील जबाबदार पुरुषांचें व सरकारचें कर्तव्य आहे. युद्धांत जयापजय होणें केवळ शस्त्रास्त्रावरच अवलंबून नसतें. तर त्या देशाचा खजीना धन-पारिपूर्ण असावा लागतो; देशांत पुष्कळशा गिरण्या, कारखाने वगैरे असावे लागतात व त्यांचा व्यापारही चांगला मोठ्या प्रमाणांत चालू असावा लागतो; तरच आणीबाणीच्या प्रसंगीं द्रव्याचा यथास्थित पुरवठा होऊं शकतो. कां कीं, त्याच्या-वर करांची आकारणी करून अवश्य तितका पैसा जमवितां येतो. कारण गिरण्या व कारखाने हींच देशाच्या उन्नतीचीं मुख्य साधनें आहेत. जो देश आपणास अगदीं अवश्य लागणारा माल स्वतः तयार न करतां दुसऱ्यावर अवलंबून असतो त्याची युद्धाच्या वेळीं अत्यंत दुर्दशा होते. इ. स. १८७६ मध्यें अमेरिकेंत दाक्षिण व उत्तर अमेरिकनांमध्यें जेव्हां युद्ध सुरू झालें तेव्हां दक्षिण अमेरिकावाल्यांचा

पराजय झाला. याचें कारण तो भाग उत्तर अमेरिकेच्या व्यापारावर सर्वस्वी अवलंबून होता हें होय. दक्षिण अमेरिकेंत कापूस, गहूं इत्यादि कच्चीं द्रव्यें उत्पन्न होत तीं उत्तर अमेरिकेच्या कारखान्यांत पाठविण्यांत येत. युद्धास सुरवात होतांच उत्तर अमेरिकावाल्यांनीं दक्षिण अमेरिकेचा माल घेण्याचें बंद केलें. ह्यामुळें त्यांचा व्यापार बंद होऊन तेथील रहिवाशांचें उत्पन्न बुडालें. लोकांचीं उत्पन्नें बुडतांच युद्धाचा खर्च चालविण्याचा कांहीं उपाय दिसेना तेव्हां अर्थातच त्यांना माघार घ्यावी लागली. अशा रीतीनें दक्षिण अमेरिका पराजित झाली. ह्याकरितां देशांत व्यापार असणें जरूर आहे व तो चांगल्या प्रकारें चालण्यास त्याच्या रक्षणार्थ योग्य उपाय योजणें अत्यावश्यक आहे.

( ४ ) ह्या पक्षाच्या लोकांचें आणखी असें ह्मणणें आहे कीं, देशाच्या भूमींतून उत्पन्न होणारे सर्व पदार्थ त्याच देशांत खर्च होऊन गेले पाहिजेत, ह्मणजे खर्च झालेल्या पदार्थांचें खत तेथेंच पडून तो देश सुपीक राहील व त्यामुळें तो सुखी होईल. असें न होतां देशांतील धान्यादि उद्भिज्ज पदार्थ बाहेर देशीं रवाना झाल्यानें त्या पदार्थद्वारें जमीनींतील सत्त्व नष्ट होत जाऊन ती कालांतरानें नापीक किंवा कमी कसदार होईल. ह्याकरितां तिच्यांतून धान्यादिकांच्याद्वारें कमी होणारें सत्त्व पुनः खतरूपानें तींत पडणें आवश्यक आहे. स्वदेशांतील वस्तूंचा उपयोग करीत गेल्यानें युद्धाच्या ऐन वेळीं कोणत्याही

पदार्थांची उणीव भासत नाहीं व दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहण्याची गरज उरत नाहीं, असेंही त्यांचें ह्मणणें आहे.

( ५ ) पांचवी गोष्ट अशी कीं, आपल्या देशांत जो माल महाग विकला जातो तोच माल व्यापारी लोक दुसऱ्या देशांत स्वस्त विकून तेथें तयार झालेला माल हाणून पाडण्याचा उद्योग करतात; अशी ही कुटिल नीति बहुतेक व्यापाऱ्यांच्या अंगवळणीं पडलेली असते. ह्याशिवाय त्यांच्या देशांतील सरकार दुसऱ्या देशांत आपल्या देशाच्या व्यवसायाचा प्रचार करण्याकरितां व्यापाऱ्यांना द्रव्यसाह्य करितें. त्यानें परदेशांत स्वस्त भावानें माल विकल्यामुळें त्याना जो तोटा आलेला असतो तो भरून निघतो. शिवाय आपल्या देशांत ज्या मालाचा खप होत नाहीं किंवा जो माल अगदीं जीर्ण असून कुचकामी झालेला असतो तो माल परदेशांत स्वस्त भावानें विकण्यांत येतो. ह्याकरितां ह्या स्वस्त विकल्या जाणाऱ्या मालावर जर कर बसविला नाहीं तर तशा प्रकारचा देशी माल कधींही विकला जाणार नाहीं; त्यामुळें अर्थात्च देशाचा व्यवसाय रसातळास जातो. याचें प्रत्यंतर पहावयाचें असल्यास अमेरिकेच्या इतिहासाकडे दृष्टि फेंकल्यास तें चांगल्या प्रकारें निदर्शनास येतें. इ. स. १८१२ मध्यें इंग्लीश व अमेरिकन यांमध्यें व्यापाराच्या बाबतींत मोठें युद्ध झालें. त्या युद्धानंतर अमेरिकनांनीं परदेशी मालावर जबरदस्त कर बसवून विलायती मालाच्या आयातीस एकदम आळा घातला. तेव्हां

इंग्लडच्या व्यापाऱ्यांनीं अमेरिकेच्या व्यापारास प्रतिकार करण्याच्या इराद्यानें सूत, ताग आणि लोखंड ह्याचे नानाप्रकारचे पदार्थ जहाजेच्या जहाजें भरून पाठविले आणि ते तेथील दुकानदारांकडून स्वस्त भावानें विकण्याचा सपाटा लाविला. अमेरिकेंतील व्यापारी तो माल उधारीनें घेत व लिलावानें विकून टाकीत. त्यांत त्यांना किफायतही चांगली होई. या सौद्यांत इंग्लंडच्या व्यापाऱ्यांचें नुकसान होत होतें. परंतु यांत त्यांचा डाव कांहीं निराळाच होता. त्यांचा हेतु हा कीं, आपल्या स्वस्त भावाच्या मालापुढें अमेरिकेच्या मालाची डाळ न शिजतां तो पडून रहावा. व त्यामुळें त्यांच्या व्यापारांत खो यावी, या बाबतींत इंग्लंडांतील लॉर्ड ब्रोघम नांवाच्या लेखकानें ह्मटलें आहे. " प्रथम आपणाला अमेरिकेंत माल स्वस्त भावानें विकून कांहीं तोटा सोसला पाहिजे. त्यानें तेथील व्यापाऱ्यांचा चांगला बींमोड होईल. तसें होतांच पुनः आपला जम बसविणें सोपें जाईल. व तेथील व्यापाराचीं सर्व सूत्रें पूर्ववत् आपल्या हातीं येतील. "

विदेशीय व्यापाऱ्यांच्या कुटिल नीतीनें जी स्वस्ताई होते ती तशीच कायम झाली तर त्यापासून कांहींएक हानि न होतां उलटा फायदाच होतो; परंतु ही स्वस्ताई करण्याचा जो मूळ हेतु असतो तो सफळ झाला ह्मणजे त्यामुळें त्या देशाचा बाल्यावस्थेंत असणारा व्यापार आणि व्यवसाय हे जर ठार बुडाले व तेथील गिरण्या, कारखाने

वगैरे बंद पडले तर ते लुच्चे व्यापारी आपल्या मालाचा भाव विलक्षण प्रमाणांत वाढवितात. ह्याकरितां आरंभींच अशा स्वस्त विकल्या जाणाऱ्या मालाचा प्रतिकार करणें इष्ट होय. अशा मालावर असे जबरदस्त कर लादण्यांत यावेत कीं, त्यांना आपला माल देशी मालापेक्षां स्वस्त भावानें देण्यास मुळींच वाव सांपडूं नये. बहुतेक स्वतंत्र देश या नियमाची अंमलबजावणी करितात. उदाहरणार्थ, कॅानडा देशांत असा कायदा आहे कीं, परदेशांतून येणारा माल जर आपल्या देशापेक्षां स्वस्त असेल व तो आपल्या व्यापारी भावांत खळबळ उडविण्याच्या हेतूनें आणला गेला असेल तर आपल्या भावांत व त्या स्वस्त मालाच्या भावांत जितका फरक असेल तितका कर त्या आयात मालावर घ्यावा. कांहीं वर्षांपूर्वीं फ्रान्स आणि जर्मनी या देशांत बीट, गाजर वगैरे कंदमूळांपासून बनणारी साखर तेथील सरकारच्या आर्थिक साह्यामुळें विदेशी साखरेपेक्षां इतकी स्वस्त झाली होती कीं, स्वतंत्र व्यापाराचें माहेरघर जें इंग्लंड त्यालाही आपल्या व्यापारास धक्का पोंचण्याची भीति वाटूं लागली, व ह्मणून त्यास त्यांवर आह्मीं जबर-दस्त कर बसवूं अशी उपरोक्त राष्ट्रांस धमकी द्यावी लागली. इंग्लंडच्या त्या धमकीस भिऊन सर्व राष्ट्रीय--महासभेनें इ० स० १९०३ मध्यें आपली बैठक केली व कोणत्याहि राष्ट्रानें तशा प्रकारें साह्य करूं नये असें ठरविलें. त्या-प्रमाणें त्या राष्ट्रांनीं मदत देण्याचें बंद केलें व सर्वत्र स्थिर-स्थावर झालें. परंतु जर्मनी आणि फ्रान्स यांनीं आपल्या

देशाच्या साखरेच्या कारखानदारांस मदत देण्याचें जर बंद केलें नसतें तर इंग्लंडलाही त्या साखरेवर आपल्या देशांत कर बसविणें भाग पडलें असतें. ह्याकरितां परदेशी माला-वर कर बसवून आपल्या देशाच्या व्यापाराचें रक्षण करणें आवश्यक आहे, आणि परदेशी माल आपल्या देशांत स्वस्त विकला जाऊन स्वदेशी मालाची हत्या करतो कीं काय तें पाहणें व त्यावर योग्य उपाय योजणें हें प्रत्येक देशाच्या सरकारचें आद्यकर्तव्य आहे.

( ६ ) ह्याशिवाय ह्या पक्षाच्या लोकांचें असें ह्मणणें आहे कीं, स्वतंत्र देश आपल्या देशांस जो व्यापार विशेष फायदेशीर असेल त्याचीच उन्नति करण्याचा प्रयत्न कर-तात; आणि ज्या वस्तूंच्या व्यापारापासून आपल्या देशाच्या प्रजेची हानि होण्याचा संभव असेल त्यांचे कारखाने उघडूं देत नाहींत. निरनिराळ्या प्रकारच्या व्यापारापासून निर-निराळ्या देशांच्या रहिवाशांच्या बुद्धीवर, शारीरावर व आचरणावर निरनिराळ्या प्रकारचे परिणाम होतात. लोहारी, इंजिनियरिंग वगैरे हस्तकौशल्याचीं कामें करणा-रांना शारीरिक व मानसिक लाभ होतो; परंतु शिंप्याचें व तंबाखू, दारू, अफू, गांजा, चहा-काफी वगैरेच्या विक्रीचें काम करणारांची सर्व प्रकारें अवनति होते. ह्याकरितां ज्या वस्तूंच्या उत्पत्तीनें देशाचा आर्थिक फायदा होतो अशाच वस्तु निर्माण करण्यास विदेशी सरकार उत्तेजन देतें. जे देश विदेशी मालावर कर बसवीत नाहींत त्यांच्या देशांत

असे पदार्थ परदेशांतून येऊन स्वस्त भावानें विकले जातात; कांकीं, हे पदार्थ अधिक प्रमाणांत तयार करण्यानें त्या देशाच्या प्रजेची शरीर आणि बुद्धि यांची अधिक उन्नति होते. मग त्यापासून द्रव्यदृष्ट्या फायदा होवो अगर न होवो; दुसरी गोष्ट अशी कीं, ते पदार्थ परदेशांतून जर मिळाले नाहींत तर त्याकरितां त्या देशास स्वत:च प्रवृत्त व्हावें लागतें. त्यानें विदेशी प्रजेची जी हानि होते तीच त्या देशाच्या वांट्यास येते. ह्यामुळेंच आपल्या देशाच्या प्रजेच्या बळाची, बुद्धीची आणि चारित्र्याची खराबी होण्याचा संभव असतो. ह्याकरतां ज्या पदार्थांच्या पैदाशीपासून सर्व देशाचा फायदा होईल असे पदार्थ निर्माण करण्याच्या कामीं उत्तेजन देणें इष्ट आहे. हे कारखाने चांगल्या प्रकारें चालण्यास अर्थांतच परदेशी मालावर जबर कर बसविणें जरूर आहे.

( ७ ) ह्या पक्षाचें अत्यंत महत्त्वाचें व शेवटचें सांगणें असें आहे कीं, परदेशी मालावर कर बसविल्यानें आपल्या देशांत गिरण्या, कारखाने वगैरे सुरू होतात. आणि त्यांत काम करणाऱ्या कामकऱ्यांची आवश्यकता उत्पन्न होते. त्यामुळें मजुरांची मजुरीही वाढते. मजुरांची मजुरी वाढल्यानें ते लोक चांगले सामर्थ्यवान् होतात व श्रीमंतही बनतात. ह्यामुळें त्यांची रहाणी सुधारून ती उच्च दर्जाची होते. त्यानें देशाचा चांगला फायदा होतो. ज्या देशांत परदेशी मालावर मुळींच कर बसविले जात नाहींत तेथें परदेशी स्वस्त मालाशीं टक्कर देण्याकरितां तेथील व्यापाऱ्यांना आपल्या देशी मालास स्वस्त विकतां येण्याकरितां

नानाप्रकारचे उपाय योजावे लागतात. ह्याकरितां ते मजुरांना अधिक मजुरी न देतां ती त्यांना होईल तितकी कमी देण्याचा प्रयत्न करितात. ह्याच कारणामुळें त्या देशांतील मजूर अत्यंत दरिद्री असतात. आणि त्यांच्या दारिद्र्यामुळेंच देशाची हानि होते. ह्याकरितां स्वदेशी व्यापार आणि व्यवसाय ह्यांचें रक्षण करण्याकरितां व मजुरांना संतुष्ट आणि सुखी बनविण्याकरितां परदेशी मालावर कर बसवून त्यांच्या स्वस्ताईस आळा घालणें आवश्यक आहे.

## स्वतंत्र व्यापाराच्या पक्षाचे तर्क.

परदेशी आयात मालावर कर बसवूं नयेत; असें प्रतिपादणाऱ्या लोकांचे तर्क इतके फोल आहेत कीं, त्यांचें खंडन केल्यावांचूनच त्यांचा फोलपणा उघडपणें दाखवितां येतो.

( १ ) या लोकांचा पहिला तर्क असा आहे कीं, परदेशी मालावर कर बसविल्यानें मनुष्याच्या स्वातंत्र्याचा अपहार होतो. प्रत्येक मनुष्य आपलेकरितां कांहीं ना कांहीं तरी जिन्नस खरेदी करतो. या त्याच्या व्यवहारास अर्थातच कोणासही हरकत करतां येणें शक्य नाहीं. परंतु परदेशी मालावर कर बसविल्यानेंही स्वतंत्र प्रजा त्या जिनसास खरेदी घेऊं शकत नाहीं. कांकीं, त्या पदार्थाची किंमत वाढते; त्यामुळें त्यांच्या अधिकाराची पायमल्ली होते. परंतु या ह्मणण्यांत कांहींच अर्थ नाहीं. जर त्या मालावर

कर बसविल्यानें सर्व देशाचें हित होतें तर त्यांत त्याचेंहि हित होतेंच होतें. मग तें हितच त्याचें स्वातंत्र्य अपहारक कसें? जर त्यापासून सर्व देशाचें अहित होत असेल तर त्याचा विचार सरकार करीलच. शिवाय कोणीहि मनुष्य असें काम करित नसतो कीं, त्याच्यावर वरील प्रकारें कर बसल्यास त्यामुळें बऱ्याच लोकांचें नुकसान होईल. शिवाय वरील प्रकारच्या स्वातंत्र्यास स्वातंत्र्य ह्मणतांच येत नाहीं. ह्याकरितां परदेशी मालावर कर बसविल्यानें कोणाचें स्वातंत्र्य लवभरही कमी होऊं शकत नाहीं.

( २ ) परदेशीय मालावर कर बसविल्यानें देशाचें द्रव्यदृष्ट्या नुकसान होतें असें जर स्वतंत्र व्यापाराच्या पक्षाचे लोक सिद्ध करते तर तें ग्राह्य झालें असतें. त्यांचा हा सिद्धांत एका अवस्थेंत खरा होऊं शकेल. ती अवस्था ह्मणजे जेव्हां नैसर्गिक कारणांनीं भिन्न भिन्न देशांत भिन्न भिन्न वस्तूंच्या पैदाशीमध्यें कमजास्त सुभीता असेल आणि एकाद्या ठिकाणीं त्या वस्तू स्वस्त बनतील तेव्हां स्वस्त वस्तू बनविणाऱ्या देशांतून दुसऱ्या देशांत त्या वस्तू तयार होऊन जातील आणि तेथें त्या विकल्या जातील. ह्या कारणास्तव परदेशी मालावर कर बसविल्यानें देशाचें धन आणि शक्ति लाभदायक पदार्थांच्या पैदाशीपासून परावृत्त होऊन परदेशांत स्वस्त बनणाऱ्या व हवापाणी इत्यादिकांची अनुकूलता नसल्यामुळें आपल्या देशांत अत्यंत महाग पर- वडणाऱ्या वस्तूंच्या पैदाशींत खर्च होतात. तेव्हां तशा

अवस्थेंत कर बसविणें इष्ट नसतें. ह्या सिद्धांताच्या पुष्ट्यर्थ असा दाखला दिला जातो कीं, समजा; एखादा डॉक्टर आहे तो डॉक्टरीचें काम चांगले प्रकारें करतो. दुसरा एक मनुष्य वकील आहे, तो वकिलात चांगल्या प्रकारें करूं शकतो; आतां तो वकील डॉक्टरीचें काम स्वत:पुरतें कां होईना करूं लागला तर तो तें उत्तम प्रकारें करूं शकेल; कारण तो बुद्धिमान् असतो. तो डॉक्टरीचा अभ्यास करील तर वरील हुशार डॉक्टराहून चांगलें काम करील व स्वतंत्रपणानें राहूं शकेल; परंतु यांत कांहीं फायदा साधला नाहीं. जो मनुष्य ज्या कामास योग्य त्यांत तो राहिल्यानेंच खरा फायदा आहे.

देशाच्या सर्व अवस्थेंत परदेशी मालावर कर बसविल्याशिवाय तो येऊं देणें श्रेयस्कर नाहीं. हें तत्त्व स्वतंत्र व्यापाराचे पक्षपाती कबूल करतात. केव्हां केव्हां एखाद्या देशाला एकाद्या वस्तूची फार गरज असते तेव्हां तो देश त्या पदार्थाच्या पैदाशीकरतां कारखानदारांस साह्य करून त्यांना तसले कारखाने उघडण्यास प्रोत्साहन देतो. वास्तविक पहातां हें कृत्य व्यापाराचें रक्षण करण्याच्या तत्त्वापैकीं आहे; परंतु ह्या पक्षांतील लोकांचें मत साधारण रीतीनें कां होईना पण व्यापार स्वतंत्र रीतीनें चालविणें अवश्य आहे; त्यावर विशेष बळवत्तर कारण असल्याशिवाय कर बसवूं नयेत असें आहे असें दिसतें. एकाद्या देशाचा व्यापार जर जुना व अनुभवी झालेला असेल तर कोण-

त्याही परिस्थितींत परदेशस्थ आयात माळावर कर बस-विण्याचें कारण नाहीं ह्या तत्त्वाचें ते विशेष समर्थन कर-तात. ज्या पदार्थांच्या पैदाशीपासून आपणास विशेष फायदा होत असेल त्या पदार्थांच्याच उत्पत्तीच्या कामीं द्रव्य व शक्ति यांचा व्यय केला पाहिजे आणि जे पदार्थ आपणाला लाभपूर्वक बनवितां येत नसतील ते परदेशांतू-नच आणविले पाहिजेत. ह्याकरतां हे जे पदार्थ आपण परदेशांतून आपल्या गरजेकरितां खरेदी करणार त्यांवर कर बसविणें श्रेयस्कर नाहीं. कारण त्यांवर कर बसविल्यानें तो पदार्थ महाग होईल, आणि तो घेणें गरिबगुरिबांना जड जाईल.

( ३ ) व्यवसायाच्या संरक्षण पद्धतीनें नवीन व्यवसायास प्रोत्साहन मिळत नाहीं असें या पक्षाचें ह्मणणें आहे. याच्या पुष्ट्यर्थ ते अमेरिकेचें उदाहरण देतात. अमेरिकेंत कारखाने अटलांटिक महासागराच्या कांठीं प्रथमतः वसूं लागले. त्यांच्या रक्षणार्थ नानाप्रकारचे उपाय योजण्यांत आले ह्मणून ते केवळ तेथेंच वसले असें नाहीं. उत्तर अमेरिकेंत कापडाचे कारखाने प्रथमतः उघडले गेले ह्मणून ते दक्षिण अमेरिकेंत उघडले गेले नाहींत असें नाहीं. वास्तविक पहातां इ. स. १८५० पासून इ. स. १९०० पर्यंत कारखान्यांची वाढ होत गेली. ती पूर्वेकडून पश्चिमे-कडे होत गेली. आणि आतां तर उत्तर आणि पूर्व भागा-पेक्षां दक्षिण आणि पश्चिम भागांतच त्यांचा विशेष प्रादु-र्भाव झाला आहे. अमेरिकेंतील कोणत्याही वसाहतीनें

त्यांच्यावर कर बसवून त्यांच्या वाढीस यत्किंचितही बाधा केली नाहीं. त्यामुळें त्यांची विलक्षण प्रमाणांत वाढ झाली असून मजुरांचीं मोठमोठीं शहरें स्थापन होऊं लागलीं आहेत.

( ४ ) अमेरिकेंत कारखान्यांची स्वाभाविकपणें ही जी वाढ झाली यावरून असें सिद्ध होतें कीं, तेथेंही माल तयार होऊन तो परदेशीं विकण्यास जातो. जो देश परदेशांत आपला माल पाठवितो त्याला त्या देशांतूनही माल खरेदी करून आणावा लागतोच. इ. स. १८७६ मध्यें जें युद्ध झालें त्यानंतर अमेरिकेंत परदेशी मालावर जबरदस्त कर बसविण्यांत आले होते; परंतु गेल्या २५।३० वर्षांत अमेरिकेनें आपली जशी उन्नति करून घेतली, तशी परदेशाशीं व्यापार करण्याच्या बाबतींत दुसऱ्या कोणत्याही राष्ट्रानें करून घेतलेली नाहीं. परदेशी मालावर कर बसविल्यानें तो कांहीं दिवसपर्यंत मंदावतो; पण तो समूळ असा कधींच नाहींसा होत नाहीं. कितीही कर लादले गेले तरी सर्व देशांत पदार्थांच्या पैदाशीचा खर्च समसमान होऊं शकत नाहीं.

( ५ ) परदेशी मालावर कर बसविल्यानें मजुरांची मजुरी वाढते हें जें सुरक्षित व्यापाराच्या पुरस्कर्त्यांचें मत आहे तें स्वतंत्र व्यवसायाच्या कैवाऱ्यांस संमत नाहीं. अमेरिकेंत मजुरी फार मोठी आहे; परंतु तितकी ती युरोपांत नाहीं. तर तेथें ती फारच कमी आहे. ती कां? ती वाढण्यास काय हरकत आहे? असा या पक्षाचा सवाल

आहे. परदेशी मालावर कर बसवून आपल्या देशांतील मजुरांची मजुरी वाढवावी अशी फ्रान्सची इच्छा आहे. त्याप्रमाणेंच विदेशी मालावर कर बसवून आपल्या देशांतील मजुरी स्थिर राखावी अशी अमेरिकेची इच्छा आहे. आरंभीं अमेरिकेचे कारखानदार मजुरींचे दर वाढल्याबद्दल कुरकुर करीत होते. ते ह्मणत कीं, मजुरांना अशी भारी मजुरी व सरकारचा खंड देऊन आह्मांला युरोपाच्या सस्त्या मालाशीं टक्कर देतां येणें अशक्य आहे. कारण तिकडे मजुरीचे दर माफक असल्यामुळें त्यांना आपला माल स्वस्त विकण्यास परवडतो. तसा आह्मांला परवडत नाहीं. परंतु या मताच्या विरुद्ध लोकांनीं त्यांचें कांहीं चालूं दिलें नाहीं. त्यांचें ह्मणणें असें होतें कीं, मजुरीचे दर भारीच असले पाहिजेत; कारण त्यानें मजूर लोक संतुष्ट राहतात आणि त्यामुळें चांगल्या मालाची निपज होते. हे दर कायम राखावयाचे ह्मणजे अर्थातूच परदेशी आयात मालावर कर बसविणें अवश्य आहे.

अमेरिकेची भूमि चांगली सुपीक असल्यामुळें तेथें कच्चा माल चांगला मिळतो. यामुळें तेथील मजूर काम चांगल्या प्रकारें करतात असें त्या पक्षाचें ह्मणणें आहे. वरील कारणामुळेंच अमेरिकेचे मजूर नेहमीं उत्साही असतात व आपल्या ह्या नैसर्गिक उत्साहामुळेंच ते पुढें ही विदेशी मजुरांपेक्षां अधिक मजुरी मिळवित राहतील. मजुरीचे दर भारी राखण्याकरतां परदेशांतून जास्त मजूर येऊं

देऊं नयेत. व परदेशी मालही येऊं देऊं नये असें ते इच्छितात. परदेशांतून अधिक मजूर न आले तर देशांतील मजूरांची संख्या कमी राहील. आणि त्यामुळें ज्यांना मजुरांची जरूर असेल ते अधिक मजुरी देऊन त्यांना कामावर लावतील. हें परदेशांतून मजूर येऊं न देण्यांतलें इंगित आहे. असा प्रकार इंग्लंडांतही झाला होता. प्लेगोबाच्या क्षोभानें तेथील प्रजेची भयंकर खराबी होऊन त्याची परिसमाप्ति झाल्यावर त्याला ही स्थिति प्राप्त झाली होती. मजुरांच्या अत्यावश्यक असणाऱ्या पदार्थांवर कर बसवूं नयेत म्हणजे त्यांना आपले अवश्यकीय पदार्थ स्वस्त परवडून त्यांचा चांगला फायदा होईल व त्यांच्या उन्नतीस मदत होईल, असें या स्वतंत्र व्यवसायाच्या पक्षाचें म्हणणें आहे.

( ६ ) विदेशी मालावर कर लाविल्यानें तो कर कांहीं बाहेरून वसूल होत नाहीं तर देशाच्या प्रजेकडून तो वसूल होतो. म्हणून हा कांहीं खरा कर म्हणतां येत नाहीं. शिवाय हा कायम टिकतही नाहीं. हा कर विदेशी मालाच्या आयातीस आळा घालण्याइतका जबर नसला तर धड स्वदेशी मालाचें संरक्षण होत नाहीं. आणि फार जबर असला तर त्यानें विदेशी माल महाग परवडून गरीब बिचाऱ्या रयतेला देशांतील मूठभर कारखानदारांच्या हिताकरतां त्रास सोसावा लागतो, असें स्वतंत्र व्यापाराच्या पक्षाचें म्हणणें आहे. परंतु याला उत्तर येवढेंच पुरे कीं,

ह्यांना त्यांत फायदा घ्यावयाचा असेल तर त्यांनींही वाटेल तर कारखाने उघडावेत. त्यांना कोणी प्रतिबंध केलेला नाहीं. आतां देशांतील प्रत्येक व्यक्ती कारखाना उघडूं शकत नाहीं हें खरें आहे पण त्याला कांहीं इलाज नाहीं. विदेशी मालावर कर बसवावयाचा ह्मणजे तो कांहीं कमी हुशार, कमसाहसी, अशिक्षित अशा गरीब प्रजेवर बसवावयाचा व त्यापासून अधिक योग्य, श्रीमंत आणि सुशिक्षित वर्गाचा फायदा करून द्यावयाचा अशांतला भाग नाहीं. आतां ती पूर्वीची आपलपोटी राजनीति नष्ट झाली आहे. आतां गरिबास पिळून श्रीमंतास पुष्ट करण्याचे दिवस राहिले नसून गरिबांच्या हिताकरतां श्रीमंतांवर कर बसविले जातात.

( ७ ) ह्या पक्षाच्या लोकांचें आणखी असें ह्मणणें कीं, सरकारचें साह्य मिळवून श्रीमंत कारखानदार लोक अधिक गब्बर बनून देशाच्या राज्यकारभारांत गोंधळ उडवून देतात. ते आपल्या फायद्याकरितां गरिबांस लांच देऊन आपल्या मताचे बनवितात व आपल्या मनुष्याची निवडणूक करवून त्याला राजसभेंत गोंवतात. त्यामुळें पुढें जे फायदे होतात ते श्रीमंतांस फायदेशीर असतात परंतु ते गरीबगुरीबांस अनिष्टकर असतात. ह्याकरितां राज्यपद्धति निर्दोष व न्यायाची राहण्याकरितां प्रजापक्षांतील लोकांचें राज्यसभेंत माताधिक्य असणें इष्ट आहे.

( ८ ) शिवाय परदेशी आयात मालावर कर बसविल्यानें तो येण्याचा बंद होतो. तेव्हां देशी कारखानदारांना

आयतेंच फावतें. ते आपल्या मालाची वाटेल ती किंमत सांगून देशाच्या प्रजेला लुटूं लागतात, असेंही या पक्षाचें ह्मणणें आहे; परंतु असें होऊं शकत नाहीं. देशी आणि विदेशी मालामध्यें जशी चुरस लागते तशी एकाच देशांतील कारखान्यामध्यें लागते. जो तो आपापला माल दुसऱ्यापेक्षां स्वस्त कसा देतां येईल तें पहात असतो. यामुळें देशी मालाची किंमत वाढत नाहीं.



## परिणाम.

दोन्ही पक्षवाल्यांच्या ह्मणण्यांत कांहीं ना कांहीं सत्य-पणाचे भाग आहेत. एकाद्या देशांत आयात मालावर कर लावल्यानें फायदा होतो. एकाद्यांत तो न लाविल्यानें होतो. उदाहरणार्थ, परदेशी आयात मालावर कर न लावल्यामुळें इंग्लंडचा फायदा होत असून तो संपन्न होत आहे. तर अमेरिका व फ्रान्स त्यावर जबर कर लावूनच श्रीमंत होत आहेत. नवीन कारखान्यांच्या रक्षणाकरितां जुन्या व अनुभवी परदेशी कारखान्यांच्या मालावर कर बसविणें अत्यावश्यक आहे. नाहीं तर ते सामर्थ्यवान् भरज्वानीचे कारखाने नवजात देशी मालाच्या कारखान्याचें बालक चिरडून टाकतील.

कोणताही देश आपल्या शेतीवरच कालक्रमण करूं शकत नाहीं. शेतकी सर्व वर्षभर चालूं शकत नाहीं.

शिवाय ज्या वर्षीं पाऊस चांगला पडेल त्या वर्षीं पीक चांगलें लाभेल. परंतु ज्या वर्षीं तो पडणार नाहीं त्या सालीं दुष्काळ पडून हजारों लोक मृत्युमुखीं पडतील. याखेरीज देशांतील सर्वच लोक शेतकी करूं शकत नाहींत. ह्याकरितां शेतकीखेरीज देशाच्या लोकांच्या जीवनार्थ अन्य व्यवसाय असणें अवश्य आहे. शिवाय कांहीं लोकांचा कल शेतकीपेक्षां कारागिरी व व्यवसाय करण्याकडे जन्मतःच असतो. त्यांच्या त्या नैसर्गिक शक्तीचा देशास व त्यांना स्वतःला फायदा मिळण्यास कारखाने व निरनिराळे व्यवसाय असणें इष्ट आहे. हे कारखाने ऊर्जितावस्थेस येण्यास अर्थातूच परदेशी मालावर कर बसविणें इष्ट आहे. आणि तोही ते कारखाने चांगला व स्वस्त माल बनविण्याच्या योग्यतेचे होईपर्यंत बसविला पाहिजे, व तो इतका बसविला पाहिजे कीं, त्यामुळें परदेशी व्यापाऱ्यांस आपला माल देशी मालापेक्षां स्वस्त देण्यास परवडूंच नये.

परंतु जेव्हां आपले कारखाने अनुभवी व जुन्या दमाचे होऊन आपल्या पायावर उभे राहण्याच्या लायकीचे होतील, व चांगला आणि परदेशी मालाच्या तोडीचा स्वस्त असा माल पैदा करून परदेशीय कारखान्याशीं टक्कर देण्याची पात्रता त्यांचे अंगीं येईल तेव्हां परदेशी मालावर कर बसविण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. उदाहरणार्थ इंग्लंडकडे पहा. त्याला आतां परदेशी मालावर कर बसविण्याची मुळींच आवश्यकता नाहीं; परंतु हिंदुस्थानची स्थिति

त्याच्या अगदीं उलट आहे. येथें स्वदेशी उद्योगधंद्यांचें व कारखान्यांचें रक्षण करण्याकरितां चांगले जबर असे कर परदेशी आयात मालावर बसविले पाहिजेत. तेव्हांच इकडे कारखान्यांचा प्रादुर्भाव चांगला विशेष प्रमाणावर होऊन ते चांगला टिकाव धरतील. आपले इकडे कारखाने निघ-तात आणि वर्ष दोन वर्षपर्यंत चालून त्यांत तोटा येतांच बंद पडतात. ह्याचें कारण एवढेंच कीं, इकडे परदेशी माल अल्पस्प कर देऊन येतात आणि त्यांच्याशीं टक्कर देण्याचें सामर्थ्य आमच्या नवीन कारखान्यांच्या आंगीं नसतें. शिवाय परदेशी नव्या कारखान्यांस त्यांच्या सरकाराकडून प्रथमतः उत्तेजनार्थ साह्य मिळतें, परंतु आह्मांला तें इकडे मुळींच मिळत नाहीं; त्यामुळें आमच्या देशाचा व्यवसाय आपलें डोकें वर काढूं शकत नाहीं. ही स्थिति नष्ट होऊन आमच्या व्यवसायाची अमेरिका किंवा युरोपांतील इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी वगैरेप्रमाणें उन्नति होईल तो काल भारत-राष्ट्राचा सुवर्णकाल गणला जाईल यांत शंका नाहीं. तो त्याला सुदैवेंकरून लौकर लाभो अशी परमकारुणिक जग-न्नियंत्याची अनन्यभावानें प्रार्थना करून हा लेख पुरा करूं.



# भाग २ रा.

## अमेरिकेंतील गृह-व्यवस्था.

हिंदुस्थानांतील पुष्कळसे लोक अमेरिकेस जातात; परंतु त्यांपैकीं कोणींहि अमेरिकेंतील स्त्रिया आपल्या घराची व्यवस्था कशी ठेवितात तें दाखविण्याचा प्रयत्न केला नाहीं. त्याचें कारण इकडून जाणारे प्रवासी बहुतेक पुरुषच असतात; त्यांचें लक्ष बहुधा राजकीय किंवा सामाजिक विषयांकडेच असतें; गृहव्यवस्थाशास्त्राची त्यांना गोडी नसते हें होय. परंतु लोकांना परकीय देशांतील रहिवाशांचे रीतिरिवाज कसे आहेत? तेथील लोक काय उद्योग करितात? व त्यांच्या करमणुकीचीं कोणकोणतीं साधनें असतात? ह्या गोष्टी जाणण्याचीच विशेष उत्कंठा असते. याकरितां तशी माहिती उपलब्ध करून ती आपल्या बांधवांपुढें मांडणें श्रेयस्कर होय. ह्मणूनच आह्मी प्रस्तुत लेखांत तशा प्रकारचा अल्प प्रयत्न करीत आहों.

अमेरिकेंतील स्त्रिया घरांतील कामकाजांमध्यें अतिशय निपुण असतात. त्या आपल्या शाळांतून ज्या गोष्टी शिकतात त्यांच्याच अनुरोधानें त्या आपल्या घरांतील कामें करितात. ह्यामुळें त्यांच्या घरचें कामही चांगल्या प्रकारें होतें व कुटुंबांतील सर्व मंडळींसही अधिक आनंद होतो.

ह्या बाबींवर कांहीं तरी लिहिल्यास वाचक बंधुभगिनींचें थोडेंबहुत मनोरंजन होऊन त्यांना उपयुक्त ज्ञानाची अल्पस्वल्प प्राप्ति होईल अशा इराद्यानें प्रस्तुत विषय लिहिण्यास हातीं घेतला आहे.

प्रथमतः आपण अमेरिकेंतील एका लहानशा शहरांत राहणाऱ्या, एका सामान्यप्रतीच्या कुटुंबाच्या गृहचर्येचें अवलोकन करूं. वाचकहो, माझ्या मागोमाग चला. मी आपणांस संयुक्त संस्थानांतील एका शहराचा प्रवास करून आणवितों. प्रस्तुत शहराची लोकसंख्या सुमारें दोन हजार आहे. येथें एक कुटुंब राहतें; त्यांत पति, पत्नी व त्यांचें एक मूल अशीं तीनच माणसें आहेत. पुरुषाचें वय सुमारें चाळीस वर्षांचें आहे. तो एका साप्ताहिक वर्तमानपत्राचा मालक व संपादक आहे. ह्या पत्रापासून त्याला प्रतिवर्षी सहा हजार रुपयांची प्राप्ति होते. त्याच्या पत्नीचें वय सुमारें तीस वर्षांचें आहे. ती एन्ट्रन्स परीक्षा उत्तीर्ण झालेली आहे. ती नोकराच्या मदतीवांचून आपल्या घरची सर्व व्यवस्था ठेवते. त्यांचा मुलगा सुमारें अकरा वर्षांचा आहे. तो आपला सर्व काल अभ्यासांत आणि खेळण्यांत व्यतित करतो.

हें कुटुंब एका दुमजली घरांत राहतें. त्यांत आठ खोल्या आहेत. खालच्या मजल्याची पुढील खोली मोठी प्रशस्त आहे. तिला एक खिडकी आहे. तींत लोखंडी सळया लावल्यांत आल्या आहेत. तिचें तोंड रस्त्याच्या बाजूस आहे.

ह्या खोलीमध्यें कोणी आल्यागेल्यास त्याचें स्वागत करण्यांत येतें. ह्या खोलीमध्यें कांहीं लहान लहान बाकें व कांहीं आरामखुर्च्या पडलेल्या आहेत, एक पियानो—बाजाही ठेवण्यांत आला आहे. खोलीच्या भिंती हिरव्या कागदांनीं मढविण्यांत आल्या आहेत. त्यांवर कांहीं वेलबुट्याही काढलेल्या आहेत. भिंतीला कांहीं छापील व कांहीं हस्तरेखांकित तसबिरी लावण्यांत आल्या आहेत, व ह्या खोलीच्या वरच्या बाजूस एक अत्यंत सुंदर असें शुभ्रवर्णी छत लाविलें आहे.

ह्या खोलीशीं जोडली गेलेली आणखी एक खोली आहे हिला दिवाणखाना किंवा बैठकघर ह्मणतात. पूर्वोक्त खोली व ही खोली ह्यांमध्यें एक दरवाजा आहे. त्यांत भिंतीमध्यें लांकडी तक्ते लाविले आहेत. ते कवाडाच्या कामीं उपयोगीं पडतात. जेव्हां जरूर पडते तेव्हां ते काढून घेऊन दार बंद करण्यांत येतें. ते तक्ते भिंतींत पुनः ढकलले कीं, पूर्ववत् त्या दोन्हीं खोल्या एक होतात. ह्या बैठकघरांत घरांतील माणसें बसतात किंवा ज्यांच्याशीं विशेष कामधाम असतें तीं माणसें बसतात. नुसते भेटीकरितां येणारे लोक पहिल्या खोलींत बसविले जातात. ही खोली पहिल्या खोलीपेक्षां कमी सजविलेली आहे. हींत एक कोच पडला आहे. जवळच एक खिडकी आहे, तींतून बागेचें सर्व दृश्य दिसतें. घरांतील मालकीण कोचावर बसते तेव्हां ती बसल्या बसल्या बागेचा देखावा उल्लासयुक्त अंतःकरणानें अवलोकन करते.

ह्या खोलींत एकीकडे भिंतींतील कपाटें पुस्तकांनीं चिकार भरून ठेविलेलीं आहेत. दुसरीकडे टेलिफोन लाविलेलें आहे. जेव्हां मालकिणीस एकाद्या दुकानांतून एकादी वस्तु मागविण्याची आवश्यकता उत्पन्न होते तेव्हां ती टेलिफोनच्या द्वारें तिची आर्डर देते. तशी आर्डर मिळतांच त्या दुकानचा कोणीतरी मनुष्य तात्काळ ती वस्तु तिला आणून देतो. ती वस्तु पसंत झाली तर मालकीण ती ठेवून घेते नाहीं तर दुसरी मागवून घेते. ह्या टेलिफोनद्वारें ती आपल्या स्नेह्यांशींहि संभाषण करते. तिला त्यांच्या घरीं वारंवार जाण्याचें प्रयोजन पडत नाहीं. स्वयंपाक तयार झाला ह्मणजे ह्या टेलिफोनच्या द्वारें ती आपल्या पतीस त्याची वर्दी देते. ऑफिसांतून एकादी वस्तु आणविण्याचें असल्यास तीहि या टेलिफोनच्या द्वारें आपल्या पतीस कळवून ती आणविते. त्याकरितां तिला ऑफिसांत जावें लागत नाहीं. किंवा दुसऱ्या कोणास पाठवावें लागत नाहीं.

खोलीच्या मधोमध एक मोठी आगटी ( चूल ) ठेविली आहे. तींत दगडीकोळसा जाळण्यांत येतो. थंडीच्या दिवसांत ही आगटी रात्रंदिवस जळत असते. त्यामुळें सर्व घर उबदार राहतें. ह्या आगटीला सर्वांगास खिडकीप्रमाणें छिद्रें आहेत. त्यांपैकीं कांहीं उघडलीं व कांहीं बंद ठेविलीं तर आठ दहा तासपर्यंत ती पेटत राहते व फार थोडा कोळसा खर्च होतो.

बैठकघराच्या तिसऱ्या कोंपऱ्यास कपडे शिवण्याची

मशीन ठेवण्यांत आली आहे. जेव्हां तिच्यावर काम करावयाचें नसतें तेव्हां ती झांकून ठेवण्यांत येते. त्या वेळीं ती एकाद्या सुंदर कपाटाप्रमाणें दिसते. जेव्हां तिच्यावर काम करावयाचें असतें तेव्हां एक कळ दाबण्यांत येते. ती दाबतांच वरील झडपे उघडतात. ही मशीन पायानें चालविण्यांत येते. ह्यामुळें काम करणाराचे दोन्ही हात रिकामे राहतात.

ह्या खोलीच्या चौथ्या कोपऱ्यांत एक टेबल ठेविलें आहे. त्यावर लेखनाची सर्व सामुग्री ठेविली आहे. जवळच एका कपाटांत कांहीं मासिक पुस्तकें व वर्तमानपत्रें ठेविलेलीं आहेत. ह्या खोलीच्या एका भिंतींत एक कोनाडा आहे त्यांत त्यांचा मुलगा आपल्या खेळाचें सर्व साहित्य ठेवितो.

बैठकघरास जोडून भोजनगृह आहे. त्याच्या मध्यभागीं एक मोठें टेबल आहे. टेबलाच्या सभोंवार खुर्च्या मांडलेल्या आहेत. भिंतीस लागून एक लहानसें कपाट उभें आहे. त्यावर कांहीं फळें व मिठाई ठेविली आहे व आंत सुरी, कांटा, बशा, प्याले, फुलपात्रें वगैरे अवश्यकीय वस्तू आहेत. भोजनसमयीं ह्या सर्वांचा उपयोग होतो.

भोजनगृहाजवळच स्वयंपाकघर आहे. त्यांत लोखंडाच्या दोन आगट्या आहेत. एकींत कोळसा व दुसरींत तेल जाळतात. कोळशाची आगटी हिंदुस्थानांतील आगट्यांहून अगदीं भिन्न असते. ती टेबलाएवढी मोठी व उंच असते. तिची रुंदी २–३ फूट असते; तिच्यावर सहा छिद्रें असतात. त्या छिद्रांवर भांडीं ठेवून स्वयंपाक

करण्यांत येतो. ह्या आगटीच्या मागें सुमारें पांच फूट उंचीवर एक भट्टी असते. जेव्हां स्वयंपाक तयार होतो तेव्हां सर्व वस्तू या भट्टीवर ठेवण्यांत येतात. त्यानें जेवणाच्या वेळेपर्यंत सर्व वस्तू ऊन राहतात; थंडगार पडत नाहींत. आगटीच्या खालीं, एका कोंपऱ्यास एक लहानसें कुंड असतें. त्यांत भांडीं धुण्याकरतां पाणी ऊन होत असतें. आगटीपासून कांहीं अंतरावर एक मोठें कुंड असतें त्यांत स्नानाकरितां पाणी ऊन होत असतें. ह्या कुंडाला लागून असणारे नळ आगटींतील अग्नीमधून गेलेले असतात. त्यामुळें ज्या वेळीं स्वयंपाक तयार होत असतो त्याच वेळीं पाणीही ऊन होत असतें. ह्या मोठ्या कुंडापासून सर्व घरभर लहान लहान नळ नेले आहेत. जेथें ऊन पाण्याची आवश्यकता लागेल तेथें नळाची चावी फिरविण्यांत येते कीं, तात्काळ ऊन पाण्याची धार सुरू होते.

ज्या आगटींत कोळसा जळतो तिच्यापेक्षां तेलाची आगटी ( चूल ) फार लहान असते. यांत ग्यासाच्या उष्णतेनें काम होतें. गृहिणी ह्या आगटीवर कोळशाच्या आगटीप्रमाणें सर्व स्वयंपाक बनविते.

ह्या खोलींत आगट्यांशिवाय एक मोठें कपाटही आहे. त्याची उंची जवळ जवळ छतापर्यंत आहे. त्याचा एक भाग टेबलाच्या आकाराचा आहे. त्यावर भोजनाची सर्व सामुग्री ठेविली आहे. गृहिणीला जेव्हां एकाद्या वस्तूची आवश्यकता वाटते तेव्हां ती आणण्याकरितां तिला लांब

जावें लागत नाहीं. प्रत्येक वस्तू तेथेंच मिळते. जी घ्यावीशी वाटेल ती लगेंच घेतां येते.

ह्या कपाटाजवळ एक आरामखुर्ची व दोन तीन साध्या खुर्च्या पडल्या आहेत. जेव्हां गृहिणी थकून जाते, तेव्हां ती यांवर बसून विसावा घेते. पाश्चात्य देशांतील स्त्रिया जनावराप्रमाणें काम करणें पसंद करीत नाहींत. होईल तेथवर आपली शक्ति कमी होऊं न देतां कोणतेंही काम करावें असें त्यांचें मत आहे. मध्यंतरीं दहा पांच मिनिटें विश्रांति घेतल्यानें कामही जास्त होतें व शरीरास थकवा-ही येत नाहीं असा त्यांचा अनुभव आहे. अशाप्रकारें आपल्या शक्तीचें पालन करून त्या आपलें सौंदर्य दीर्घ-काळपर्यंत कायम राखतात. त्या अशा प्रकारें विश्रांति न घेत्या तर त्यांचें शरीर निर्बळ होऊन त्यांना अकालींच वार्धक्य येतें.

ज्या वेळीं गृहिणी स्वयंपाक करूं लागते, तेव्हां तिचा कोणी स्नेही आला तर तो थेट स्वयंपाकघरांत जातो व तिच्याशीं गप्पागोष्टी करीत बसतो किंवा तिला तिच्या कामांत साह्य करतो.

स्वयंपाकगृहाच्या एका कोंपऱ्यांत चिनीमातीचें पेल्याच्या आकाराचें एक भांडें असतें. तें जमीनीपासून सुमारें तीन फूट उंचीवर बसविलेलें असतें. त्याच्यावर कांहीं अंतरावर तीन नळ बसविलेले असतात. एकानें थंड व दुसऱ्यानें ऊन पाणी येतें. हें पाणी भांडीं घांसण्यास उपयोगी पडतें.

तिसऱ्या नळानें पिण्याचें पाणी मिळतें. ह्या भांड्याच्या खालीं एक छिद्र असतें. ह्या छिद्रांतून पंपाच्याद्वारें घाण पाणी बाहेर निघून जातें. जेव्हां भांडीं किंवा कपडे धुवा-वयाचे असतात, तेव्हां हें छिद्र बूच बसवून बंद करण्यांत येतें. जेव्हां भांडीं वगैरे धुतलीं जातात तेव्हां पुनः तें भोंक मोकळें करण्यांत येतें ह्मणजे मळीन पाणी तात्काळ निघून जातें. ह्या भांड्याजवळ एक मोठें टेबल ठेविलेलें असतें. त्यावर खरकटीं भांडीं ठेविलीं जातात. ह्या टेब-लांत एक कप्पा असतो. त्यांत सुरी, कांटा, चमचा वगैरे सामान असतें. ह्या सर्व वस्तु स्वयंपाकघरांत उपयोगी पडतात. त्यांच्या मदतीनें स्वयंपाकाचें काम फार सुकर होतें.

स्वयंपाकगृहाच्या सर्व बाजूंस भिंतींतून कपाटें किंवा फडताळें आहेत. त्यांत स्वयंपाकाच्या कामीं उपयोगीं पड-णारीं भांडीं ठेविलीं आहेत. ज्या भांड्यांची गरज वारंवार लागते तीं जवळच्या कपाटांत ठेविलीं आहेत, व जीं कधीं तरी उपयोगीं पडतात तीं लांबच्या कपाटांतून ठेविलीं आहेत. ह्या व्यवस्थेचा मुख्य उद्देश हा कीं, गृहिणीला स्वयंपाक करतांना अगदीं अल्प श्रम व्हावेत.

ह्या घराच्या वरही चार खोल्या आहेत. त्यांपैकीं तीन खोल्या निजण्याकरितां व एक शौचमुखमार्जनादि विधि व स्नान याकरितां आहे. पति-पत्नी एकाच खोलींत निज-तात. मुलगा दुसऱ्या खोलींत निजतो. तिसरी खोली आगंतुक पाहुण्याकरितां राखून ठेविलेली असते. सर्व

खोल्यांत सारखेंच सामान आहे; ह्मणून एका खोलीचें अव-लोक करूं ह्मणजे त्यांच्या शयनगृहाची आपणास कल्पना येईल. ही पहा मुख्य खोली. हिची स्थिति आतां आपण पाहूं.

ह्या खोलींत एक मोठा पलंग आहे. त्याच्या बाजू पितळेच्या आहेत व तो तारांनीं गुंफिला आहे. तारांच्या जाळीवर एक गादी आहे. गादीवर एक दोन कांबळीं असून त्यांवर पांढरी चादर अंथरली आहे. पांघरण्या-करितांही कांहीं कांबळीं आहेत. त्या सर्वांच्या खालीं एक सुती चादर आहे. ह्यामुळें निजणारी व्यक्ति दोन पांढऱ्या चादरीमध्यें सुखानें पहुडते व कांबळाहि खराब होत नाहीं. हीं चादरें व तक्के यांचे अभ्रे वरचेवर धुतलीं जातात. दिवसा ह्या बिस्तऱ्यावर एक सुंदर कापड हंतरलें जातें. त्यामुळें एक तर कांबळा खराब होत नाहीं व दुसरें, तो बिछाना दिसण्यांत चांगला दिसतो.

स्वयंपाकगृहाप्रमाणें ह्या खोलींतही एक प्रक्षालनपात्र आहे. परंतु हें पात्र त्याहून सुंदर आहे. हें मुखप्रक्षालनार्थ व हातपाय धुण्याकरितां आहे. भिंतीस टेंकून एक कपा-टाकार वस्तू आहे हिला "ड्रेसर" ह्मणतात. हिची उंची अडीच फूट व लांबी तीन चार फूट आहे. ह्यांत कांहीं कप्पे आहेत. मागील अंगास एक मोठा आरसा आहे. केसांत लाविण्याचे निरनिराळ्या प्रकारचे कांटे (पिन), सुया, दोरे, अलंकार, भिन्न भिन्न प्रकारच्या पावडरी, रुमालें, फिती वगैरे शृंगाराच्या वस्तू कप्यांतून

ठेविल्या आहेत. शृंगारच्या समयीं घरची स्त्री हें कपाट उघडते. ब्रश, कंगवा, आरसा व कात्री वगैरे वस्तू तर " ड्रेसर " च्या वरच ठेविण्यांत येतात.

" ड्रेसर " च्या बरोबरच एक मोठें कपाट आहे. ह्याला पुष्कळच कप्पे आहेत. त्यांतून कपडे ठेविले आहेत. एका कोंपऱ्यांत आणखीं एक कपाट आहे त्यांत पतिपत्नींचे दररोज परिधान करण्याचे कपडे आहेत. बिस्तऱ्याजवळ एक लहान टेबल आहे. त्यावर कांहीं मासिकें, वृत्तपत्रें व पुस्तकें पडलीं आहेत. पत्रें वगैरे लिहिण्याकरितां कोरे कागदही ठेविले आहेत. करमणुकी-करतां कांहीं वाचावेंसें वाटल्यास वाचतात.

स्नानगृहांतही शयनगृहाप्रमाणेंच सर्व शृंगारसाहित्य असून शिवाय एका मनुष्यास सपशेल निजतां येईल असें विस्तृत प्रक्षालनपात्र आहे. ह्या पात्रास दोन नळ जोडलेले आहेत; एकानें ऊन व दुसऱ्यानें थंड पाणी येतें. पात्राच्या खालीं एक छिद्र आहे. स्नान झालें ह्मणजे तें उघडण्यांत येतें तेव्हां मलिन पाणी पंपाच्या मार्गानें बाहेर पडतें.

सर्व घरांत विजेच्या तारा लाविल्या आहेत. जरा बटन दाबलें कीं, सगळ्या घरांत लखलखाट होतो. प्रत्येक बिस्तऱ्याच्या उशाश एकेक विद्युद्दीप लटकत असतो. वाटेल त्याच्या प्रकाशांत स्वस्थपणें विश्रांति घ्यावी किंवा कांहींतरी वाचावें.

सर्व खोल्यांतील जमीन लांकडी असून त्यावरून वार्निस दिलेलें आहे. खोलीच्या लांबीरुंदीप्रमाणें प्रत्येकींत

चटई अंथरली आहे. जमीन अशा प्रकारची ठेवल्यानें शरीरप्रकृतीस फायदा होतो व त्यामुळें त्रासही होत नाहीं.

गृहव्यवस्थेचें वर्णन संपलें. आतां आपण घरांत राहणाऱ्यांची थोडीबहुत माहिती करून घेऊं. त्यावरून अमेरिकेंतील मध्यम श्रेणीचे लोक आपलें जीवित कसें व्यतित करतात तें आपणांस कळून येईल. रविवारपासून शनिवार अखेर एका आठवड्यांत त्यांचा चारित्र्यक्रम कसा असतो तें पाहूं.

रविवारीं सर्व कुटुंब सकाळच्या नवापर्यंत निजलेलें असतें. कारण त्या दिवशीं मालकास आफिसांत जावें लागत नाहीं. रविवारीं बराच उशीर होईपर्यंत निजून राहण्याचा प्रघात सर्व अमेरिकेंत प्रचलित आहे. कोणी कोणी तर दुपारपर्यंत निजून राहतात. पति आपल्या पत्नींपूर्वीं थोडा वेळ अगोदर उठतो आणि थंडीचे दिवस असले तर बैठकीच्या आगटींत अग्नि प्रज्वलित करतो. थंडीच्या दिवसांत रात्रंदिवस अग्नि पेटत असतो. पत्नीच्या उठण्याच्या वेळेपर्यंत सर्व घर ऊबदार होऊन जातें. उन्हाळ्याचे दिवस असले तर पति ग्यासची आगटी ( चूल ) पेटवून तिच्यावर चहाचें आधण ठेवितो. गृहिणी कपडे घालून येईपर्यंत पाण्यास उकळी फुटते. अमेरिकेंतील पुरुष घरकाम करण्यांत कमीपणा आहे असें मानीत नाहींत. उलटें तेथील लोकांस आपल्या पत्नीस साह्य करण्यांत आनंद वाटतो.

स्त्री सकाळीं शृंगार करीत नाहीं. त्या वेळीं ती साधीं वस्त्रें परिधान करते व केंस साधारण ठाकठीक करून घेते. यांत तिचीं ४।५ मिनिटें व्यतित होतात. ती कपडे घालणें पुरें झाल्यावर स्वयंपाकघरांत जाते व स्वयंपाक करण्यास प्रारंभ करते.

स्वयंपाक करीत असतां चार पांच मिनिटें फुरसत मिळाली तर तेवढ्यांत ती सर्व वस्तू व्यवस्थित ठेवून देते. सकाळचें जेवण झाल्यावर गृहिणी ताटें धुऊन मुख्य पक्वान्न बनविण्यास सुरवात करते. भांड्याखालीं आवश्यकतेप्रमाणें जाळ लावून ती स्नान उरकून घेते व कपडे परिधान करून प्रार्थनामंदिरांत जाते. सुमारें एक वाजतां ती परत येते तेव्हां सर्व पक्वान्न चांगलें तयार झालेलें असतें. नंतर जेवणाचे सर्व पदार्थ ती भोजनगृहामध्यें टेबलावर व्यवस्थित ठेवून देते. तीन वाजेपर्यंत सर्व ताटें ( ह्मणजे बशा ) धुऊन जागच्या जागीं ठेवून देते. तिसऱ्या प्रहरचा बाकीचा वेळ आपल्या पतीशीं अथवा भेटीस येणाऱ्या इष्टमित्रांशीं गप्पागोष्टी करण्यांत व्यतित करते, अथवा वर्तमानपत्रें, मासिकें वगैरे वाचण्यांत कालक्षेप करते. कधीं कधीं सर्व परिवार सहलीनिमित्त एकाद्या गांवीं जातो. सायंकाळीं काळोख पडण्यापूर्वीं ती सर्व मलीन कपडे एकत्र करून घेऊन ते ऊन पाण्यांत भिजत टाकते; त्यांत साबण टाकून त्यांचें खूब मर्दन करते. कपड्यांवर डाग पडलेले असले तर एकाद्या रासायनिक पदार्थानें ते नाहींसे करून नंतर

त्यांना साबण लावते. तिच्या संग्रहीं पुष्कळ तऱ्हेचे रासायनिक पदार्थ असतात. कांहीं वेळानें तर ती स्वयंपाक बनवून घेते. त्यानंतर सर्व परिवार प्रार्थनामंदिरांत जाऊन अर्ध्या पाऊण घंट्यांत परत फिरतो. निजण्यापूर्वीं सर्व लोक थोडेंबहुत वाचतात किंवा इष्टमित्रांना पत्रें लिहितात.

सोमवारीं सर्व लोक लौकर उठतात. पति स्वयंपाकगृह व कपडे धुण्याची भट्टी यांमध्यें अग्नि प्रदिप्त करतो. स्वयंपाकगृहाच्या जवळ कपडे धुण्याची सोय असते. जितक्या वेळांत पति अग्नि प्रदिप्त करून कपडे धुण्याकरतां पाणी चढवितो, तितक्या वेळांत गृहिणी सकाळचें जेवण तयार करून घेते व घर झाडून साफ करते. स्वयंपाक तयार झाल्यावर धुण्याचें काम सुरू होतें. कपडे कधीं कधीं मशिननें धुण्यांत येतात. त्यांत पाणी, साबण व कपडे भरून विद्युत् ब्याटरीशीं तिचा संयोग करण्यांत येतो. विद्युच्छक्तीनें तें यंत्र फिरूं लागतें व कपडे एकमेकांवर घांसके गेल्यामुळें ते स्वच्छ होतात. जेव्हां यंत्र चालू करण्यांत येत नाहीं तेव्हां गृहिणी साबण व कांहीं रासायनिक पदार्थ यांत ते कपडे उकळून खालीं उतरून घेते व ते हातानें धुते. कपडे हातानें किंवा यंत्रानें धुण्याचें काम दोनप्रहरपर्यंत खलास होतें. दुपारीं सर्व कपडे बागेंत वाळत असलेले दृष्टोत्पत्तीस येतात. एक वाजतां जेवण तयार होतें व दोन वाजतां ताटें धुऊन ठिकाणावर ठेविलीं जातात. ह्यानंतर गृहिणी थोडा वेळ आरामखुर्चीवर विश्रांति घेत पडते किंवा झोंप घेते. तेथून उठल्यावर ती स्नान करते व

कपडे घालून थोडेंबहुत शिवणकाम करते किंवा एकाद्या मित्रास भेटयास जाते. सायंकाळचा स्वयंपाक बनविण्याच्या वेळेस ती परत फिरते. निजण्यापूर्वी जो वेळ मिळतो, तो लिहिण्यावाचण्यांत किंवा खेळ तमाशांत व्यतित होतो. कधीं कधीं सर्व परिवार नाटक किंवा बायस्कोपचा खेळ पाहण्यास जातो.

सोमवारीं रात्रीं निजण्यापूर्वीं गृहिणी धुतलेल्या कपड्यांच्या घड्या करून ठेविते. मंगळवारीं सकाळीं जेवण झाल्यावर व घरचें काम संपल्यावर ती त्या कपड्यांना इस्तरी करते. या कामांत तिचे दोन तास खर्च होतात. हें काम बहुधा दोनप्रहरपर्यंत खलास होतें. यदाकदाचित् धुतलेले कपडे फार असले तर इस्तरीचें काम थोडें बुधवाराकरितां राखून ठेविण्यांत येतें. तिसऱ्या प्रहरचा वेळ वाचण्यांत, शिवणकामांत, बाजारांतील जिन्नस खरेदी करण्यांत व इष्टमित्रांची भेट घेण्यांत खर्च होतो. कांहीं स्त्रिया सोमवारीं तिसऱ्या प्रहरींच कपड्यांची इस्तरी करून टाकतात. यामुळें मंगळवारीं त्यांना दुसरें कांहीं मोठेंसें काम शिल्लक रहात नाहीं; परंतु असें करणें बहुतेक लोकांस पसंत नसतें. कारण या पद्धतीनें स्त्रियांना एकाच दिवशीं फार काम करावें लागतें व दुसऱ्या दिवशीं त्यांना कांहींच करावें लागत नाहीं.

बुधवार व गुरुवार विश्रांतीचे दिवस आहेत. या दिवशीं घरचें काम फार थोडें करण्यांत येतें. दोन तीन तासांत सुटी मिळते. बाकीचा वेळ गृहिणी आपल्या

इच्छेनुसार वाचनांत घालविते किंवा दुसऱ्या एकाद्या करमणुकीच्या कामांत व्यतित करते. शहरांत एक पुस्तकालय आहे. प्रत्येक मनुष्य तेथून पुस्तकें आणतो. आमची ( प्रस्तुत लेखांतील ) गृहिणीही कधीं कधीं पुस्तकें आणते. स्वतः तिच्या घरांतहि एक पुस्तकालय आहे. तिनें कांहीं वृत्तपत्रें व मासिक पुस्तकें सुरू केलीं आहेत. यामुळें तिला नेहमीं कांहीं ना कांहीं सुंदर विचार मनन करण्याची संधि दररोज सांपडते. ती दोन तीन स्त्री-समाजाची सभासद आहे. चित्रें काढणें, पियानो वाजविणें व गाणें ह्मणणें ह्या कला तिला अवगत आहेत. बहुतेक सार्वजनिक संस्था व सभा ह्याविषयीं तिला आस्था वाटते. संधि सांपडल्यास त्यांत काम करण्यांतही ती आपला काल व्यतित करते.

बुधवारीं संध्याकाळीं प्रार्थनामंदिरांत जाऊन सर्वांबरोबर एक तासभर ती प्रार्थना करते.

शुक्रवार हा घराच्या साफसुफाईचा दिवस आहे. ह्या दिवशीं गृहिणी सर्व घर झाडून लोटून स्वच्छ करते. प्रत्येक खोली एका अंगापासून दुसऱ्या अंगापर्यंत झाडते. जमीनीवर अंथरलेल्या चटया उचलून त्या काठीनें बडवून त्यांतील सर्व धुरळा झाडते. ज्या केरसुणीनें ती आपलें घर साफ करते, ती बारा इंच रुंद व पंधरा इंच लांब असते. तींत दोन ब्रश व एक लहानशी पेटी असते. जेव्हां केरसुणीनें झाडण्यास सुरवात होते तेव्हां हे दोन्ही ब्रश फिरूं लागतात. त्यामुळें सर्व केरकचरा त्या पेटींत जमा होतो. ह्या केरसुणीचा दांडा कळकाचा असतो. तो धरून गृहिणी

अगदीं अल्प सायासानें चालूं लागते, तिला खालीं वांकावें लागत नाहीं. सांप्रत अमेरिकेंतील बहुतेक घरें एक प्रकारच्या विद्युत् यंत्रानें साफ केलीं जातात. हें यंत्र हातानेंहि चालवितां येतें. तें टेबलावर किंवा खुर्चीवर लावतात ह्मणजे तें घरांतील सर्व केरकचरा आकर्षण करून घेतें; परंतु या यंत्राची किंमत फार जबर असते, ह्यामुळें तें सामान्य लोकांस घेतां येत नाहीं. श्रीमंत लोक तें आपल्या संग्रहीं ठेवतात. सामान्य लोक केरसुणीनेंच आपलीं घरें साफ करतात. चटया झाडूनझुडून स्वच्छ केल्यावर गृहिणी खालची जमीन स्वच्छ करते. ह्या स्वच्छतेच्या कामांत दिवसांतील मुख्य भाग निघून जातो. ह्याकरितां अमेरिकन गृहिणी शुक्रवारीं बहुधा बाहेर पडत नाहीं. आपलें काम संपल्यावर ती विश्रांति घेते.

शनिवारीं अमेरिकेंतील गृहिणी चांगल्या चांगल्या पदार्थांचें पक्वान्न बनविते. हें पक्वान्न रविवारींहि उपयोगीं पडतें. हें करण्यास तिला तिसरा प्रहर लागतो. नंतर कपडे घालून ती बाजारांत माल खरेदी करण्यास जाते किंवा मित्रांच्या भेटी घेते. संध्याकाळीं प्रार्थनागृहांत जाऊन तेथील बाजावर दुसऱ्या दिवशीं प्रार्थनामंदिरामध्यें गाण्या लागणाऱ्या गीतांचा अभ्यास करते.

अशा प्रकारें अमेरिकन स्त्रियांचा आठवड्याचा जीवनक्रम असतो. शिवाय ‘ रोटी ’ बनविणाऱ्या गृहिणी आपल्या घरचें काम स्वतःच करतात. रोटी बहुधा बाजारांतून विकत आणली जाते. अमेरिकन गृहिणी आपल्या मुलांचे

सर्व कपडे व आपले कपडे स्वतः बनवितात. इतकें काम करूनही त्यांचें घर अगदीं स्वच्छ असतें. कोणत्याहि दिवशीं व कोणत्याहि वेळीं गेलें तरी त्यांचें घर इतकें स्वच्छ असतें कीं, जणुं काय एकाद्या पाहुण्याच्या आगमनाप्रीत्यर्थ तें मुद्दाम परिष्कृत करून राखण्यांत आलें आहे !

मोठ्या शहरांत राहणाऱ्या गृहिणींना आपलीं कामें करण्याच्या कामीं फारच सोयी अनुकूल असतात. शहरांतील घरें वाफेच्या उष्णतेनें ऊबदार राखण्याची व्यवस्था केलेली असते व नुसती तोटी फिरविली कीं वाटेल तितकें ऊन पाणी मिळतें. कपडे धुण्याचें यंत्रही केवळ तिला उघडावें व बंद करावें लागतें. शिवाय पावसाळ्यामध्यें कपडे वाळविण्याकरितां एक स्वतंत्र हॉल ( मंदिर ) असतें. तशीं मंदिरें लहान शहरांतून नसतात. भोजन बनविण्याच्या कामींही शहरांत चांगल्या सोयी असतात तशा लहान शहरांतून नसतात. अमेरिकेंत १५०० पेक्षां जास्त वस्तीचीं किंवा त्याहून अधिक संख्येचीं जीं शहरें आहेत, त्यांतून म्युनिसिपालट्यांकडून पाण्याच्या नळांची व्यवस्था करण्यांत आली आहे. विद्युत्चे कारखाने आहेत व अल्पस्प खर्चानें घरांत विद्युत्चा पुरवठा करतां येतो. टेलीफोनचीही सुव्यवस्था केलेली असते. सार्वजनिक ग्रंथसंग्रहालयेंही असतात. तीं नेहमीं उघडीं असतात. तीं अगदीं मोफत असतात. ठिकठिकाणीं शहरभर बाष्पगृहें असतात. त्यांतून नळ काढून लोकांच्या घरांत वाफ

नेलेली असते. घरांत वाफ बनविण्यापेक्षां वाफेचा नळ मागविल्यानें फार थोडा खर्च येतो. सर्वत्र मुलांमुलींकरितां मोठमोठ्या शाळा आहेत. त्या अगदीं पूर्ण मोफत असतात. प्रत्येक मुलास व मुलीस चौदा वर्षांच्या वयापर्यंत शाळेंत शिकावेंच लागतें. जे आईबाप या नियमाचें उल्लंघन करतात, त्यांना अर्थात्च दंड होतो.

अमेरिकेंतील स्त्रिया इतक्या उत्कृष्ट प्रकारें आपलें काम करतात याचें कारण त्यांच्यांत झालेला विद्येचा प्रसार होय. विद्येच्या बळावरच त्या आपलें काम अल्प काळांत सफाईनें करतात. आणि बाकीचा वेळ लिहिण्यावाचण्यांत व मनोरंजनांत घालविण्यांत वाचवूं शकतात. विद्येच्या बळावर त्या नित्य नवीन नवीन युक्त्या शोधून काढतात; त्यामुळें त्यांच्या श्रमाची व वेळेची बचत होते. आपल्या श्रमाची बचत कोणत्या यंत्रानें करतां येईल हें त्यांना विद्येनें कळतें. अमेरिकेंतील स्त्रियांस कोणतेंहि काम करण्यास संकोच वाटत नाहीं. तेथील मोठमोठ्या विद्वान् स्त्रिया सुद्धां आपल्या घरांस कागद चिकटवीत व पोतांनीं त्याला सौंदर्य आणण्याचा उद्योग करीत असतात. अशा कामांत त्यांना मोठा आनंद वाटतो. एकाद्या खुर्चीची किंवा टेबलाची कांहीं मोडतोड झाली तर त्या स्वतः त्याची दुरुस्ती करतात. बहुतेक स्त्रियांना सुतारकामाची माहिती असते. थोड्याशा खर्चानें त्या आपल्या घरास उत्कृष्ट सौंदर्य आणतात. घरचीं सर्व कामें करणें त्या आपलें कर्तव्य समज-

तात. घर हेंच त्यांचें राज्य व त्या त्याच्या स्वामिनी अशी भावना अमेरिकेंत सर्वत्र आहे.

अलीकडे अमेरिकेंतील स्त्रिया घरांतील कामकाज म्हणजे एक लचांडच होय असें समजून त्याचा तिरस्कार करतात; ही गोष्ट खरी आहे; त्यामुळें हजारों–लाखों स्त्रियांनीं नानाप्रकारचे उद्योग स्वीकारले आहेत. सध्यां कारखान्यांत, दुकानांत व ऑफिसांत सर्वत्र स्त्रियांची रेलचेल झालेली आहे असें आढळून येतें. अमेरिकन स्त्रियांचा ज्यांत प्रवेश झालेला नाहीं, असा कोणताहि व्यवसाय उरलेला नाहीं. असें आहे तथापि अमेरिकेंतील बहुतेक स्त्रियांचा ओढा घरांतील कामकाजाकडेच विशेषतः आहे. घरांतील कामकाज तेथें दिवसेंदिवस सुगमही होत चाललें आहे. नवीन नवीन प्रकारच्या चुली बाहेर पडत आहेत. त्यांत कित्येक तर अशा आहेत कीं, त्यांवर भोज्यपदार्थ नुसते चढवून दिले कीं बस्स आहे. थोड्या वेळानंतर ते आपोआप शिजून तयार होतात. दुसऱ्या अनेक प्रकारच्या यंत्रांच्या शोधांनींहि पुष्कळ प्रकारच्या अडचणी दूर झाल्या आहेत, आणि असें असूनही शिवाय अमेरिकेंतील शाळांत गृहव्यवस्थेचें शिक्षण दिलें जात आहे. गृहव्यवस्थाशास्त्रांत अमेरिकेंतील मुली बी. ए व एम्. ए. च्या पदव्या, आपले इकडे विश्वविद्यालयांतील विद्यार्थी इतिहास, साहित्य, रसायन वगैरे शास्त्रांत जशा पदव्या मिळवितात त्याप्रमाणें त्या तेथें मिळवितात.

---

# अमेरिकेंतील शिक्षणपद्धति.

शिक्षणपद्धतीच्या दृष्टीनें सांप्रत अमेरिका सर्व जगांत श्रेष्ठ आहे. युरोपांतील कांहीं देशांत अमेरिकेपेक्षां विद्येचा प्रसार अधिक झाला आहे ही गोष्ट खरी आहे. तथापि अमेरिकेंत अज्ञान नाहींसें करण्याकरितां व विद्या-वृद्धीकरितां जो उद्योग केला जातो तो अन्य ठिकाणीं आढळणें अशक्य आहे. अमेरिकेची लोकसंख्या अवघी १० कोटि आहे; ह्मणजे एकंदर पृथ्वीच्या लोकसंख्येच्या एक षोडशांश आहे; परंतु पृथ्वींतील सर्व धनाचा एक तृतियांश भाग तेथें आहे. इतकी धनोत्पत्ति तेथें होण्याचें खरें कारण ह्मणजे तेथें झालेला शिक्षणाचा पायाशुद्ध व सार्वत्रिक प्रसार होय.

## प्राथमिक शिक्षण.

अमेरिकेंत प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचें आहे. अगदीं लहान खेडेगांवांत सुद्धां नुसतीं ५ मुलें जेथें जमलीं, तेथें शाळा उघडण्यांत आल्या आहेत. प्रत्येक प्रांत शिक्षणाचे कामीं इतर प्रांतांवर ताण करण्याच्या इराद्यानें अहमहमिकापूर्वक खर्च करितो व जिवापाड यत्न करतो. मुलांना प्राथमिक शिक्षण द्यावयाचें तें किंडर गार्डन पद्धतीनें देणें श्रेयस्कर आहे, अशी अमेरिकनांची भावना असून तदनुरूप त्या पद्धतीचा तेथें दिवसेंदिवस जास्त जास्त फैलाव होत आहे. पनामा प्रदर्शनांतहि शिक्षण-

विभागाचें भवन बनविण्यांत आलें आहे. त्यांत प्रत्येक प्रांतांतील शिक्षणसंबंधीं सामुग्री एकत्रित करण्यांत आली आहे. ह्या भवनामध्यें कांहीं संस्थानांकडून एक प्रचंड नकाशा तयार करण्यांत आला आहे; त्यांत चित्रविचित्र रंगांचे लहान लहान विद्युद्दीप लाविलेले आहेत. शिक्षणाचे भिन्न भिन्न विभाग दाखविण्याकरितां तांबडे, पांढरे, पिंवळे व निळे दिवे लाविले आहेत. प्राथमिक शिक्षण दाखविण्याकरितां हजारों लहान लहान दिवे असे चमकतात कीं, नकाशावर जणुं सगळे दिवेच दिवे विखुरले आहेत! अशा प्रकारें दुय्यम प्रतीचे शिक्षणविभाग दाखविले आहेत. प्रत्येक प्रांतानें कांहीं पुस्तकें छापविलीं आहेत. त्यांपैकीं एका पुस्तकांत असें दाखविलें आहे कीं, विद्येनें सुसंस्कृत झालेल्या मनुष्यास प्रत्येक दिवसास २७ रुपये प्राप्ति होते. उदाहरणार्थ, कल्पना करा कीं, अशिक्षित मनुष्य सर्व वर्षांत ५०० डालर मिळवितो. आतां तो ४० वर्षें मजुरी करील तर ५००×४०=२०००० डॉलर मिळवील. हायस्कूलचें शिक्षण मिळवून व एकाद्या धंद्याचें ज्ञान मिळवून एक मनुष्य सुमारें १००० डॉलर प्रत्येक वर्षास मिळवितो. आतां हा दुसरा मनुष्य ४० वर्षेंपर्यंत प्राप्ति करीत राहील तर तो ४०००० डॉलर मिळवील. ही योग्यता मिळविण्यास १२ वर्षेंपर्यंत दुसऱ्या व्यक्तीस शिकावें लागलें आहे, आणि प्रत्येक वर्षांत १८० दिवस त्यानें शिक्षण घेतलें आहे किंवा अभ्यास केला आहे. ह्मणजे १८०×१२=२१६०

दिवस शिक्षण घेतल्यामुळें त्याला २०००० डॉलरची अधिक प्राप्ति झाली अर्थात् २००००÷२१६०=९ डॉलर प्रत्येक दिवसास प्राप्ति होऊं लागली हें शिक्षणाचें फळ होय. अशा प्रकारें एकीकडून विद्येपासून होणाऱ्या फायद्यांचें प्रदर्शन व दुसरीकडून सर्व प्रकारच्या सोई एकसमयावच्छेदेंकरून करण्यांत येत आहेत. अमेरिकेंत किंडर गार्डन पद्धतीनें सर्वांस प्राथमिक शिक्षण घ्यावेंच लागतें. १४ वर्षांच्या वयानंतर मुलांमुलींस त्यांच्या इच्छेनुरूप शाळा सोडून कोणत्याहि व्यवसायांत शिरतां येतें. सामान्य प्रतीच्या लोकांचीं मुलें या वयांत बहुतकरून शिकण्याचें बंद करितात. केवळ शेंकडा ५ मुलें उच्च शिक्षणाच्या प्राप्तिप्रीत्यर्थ प्रयत्न करतात. ह्याकरितां सामान्य लोकांत उच्च शिक्षणाची आस्था उत्पन्न करण्यासाठीं त्यांना ह्या शिक्षणापासून काय फायदे आहेत. तें नीट समजावून सांगण्यांत येतें. न्यूयार्क प्रांताकडून शाळेंत चार वर्षें शिक्षण घेतल्यास आर्थिक लाभ किती होणार आहे याचें पुढीलप्रमाणें विवेचन प्रसिद्ध करण्यांत आलें आहे. ब्रूक लायनींतील एका मुलाचें उत्पन्न दाखविलें आहे. ज्या मुलानें १४ व्या वर्षाच्या वयांत शिकण्याचें सोडलें त्याला पुढील प्रकारची प्राप्ति झाली. त्याच्या वयाच्या १४ व्या वर्षीं वार्षिक २०० डॉलर, १६ व्या वर्षीं २५० डॉलर, १८ व्या वर्षीं ३५० डॉलर, २० व्या वर्षीं ४७५ डॉलर, २२ व्या वर्षीं ५७५ डॉलर, २४ व्या वर्षीं ६०० डॉलर

व २५ व्या वर्षी ६८८ डॉलर. ही अर्धवट शिकलेल्या मुलाची प्राप्ति झाली. परंतु ज्या मुलानें १८ वर्षाच्या वयापर्यंत शिक्षण घेऊन हॉयस्कूलची परीक्षा उत्तीर्ण केली, व कांहीं तरी कला संपादन केली त्याची प्राप्ति पुढील-प्रमाणें झाली. १८ व्या वर्षी वार्षिक ६०० डॉलर, २० व्या वर्षी ७५० डॉलर, २२ व्या वर्षी १००० डॉलर, २४ व्या वर्षी ११५० डॉलर, व २५ व्या वर्षी १५५० डॉलर, अशा प्रकारें पूर्वोक्त मनुष्याला १४ व्या वर्षापासून २५ व्या वर्षांपर्यंत ११ वर्षांत एकंदरींत ५१११½ डॉलरचें उत्पन्न झालें. व उपरोक्त मनुष्याला केवळ ७ वर्षांत ७३३७½ डॉलरचें उत्पन्न झालें. यावरून असें स्पष्ट दिसून येतें कीं, चार वर्षें अधिक शिकण्यानें सुमारें ९०० डॉलर प्रत्येक वर्षागणिक अधिक मिळवितां येतात आणि चार वर्षें अधिक शिकण्याकरितां तद्देशीय सरकारकडून सर्व प्रकारचा बंदोबस्त असतो. कोणत्याही प्रकारें फी वगैरेंचा खर्च पडत नाहीं.

## शिक्षण-क्रम.

लास एंजिलस शहराची लोकसंख्या सुमारें ५॥ लाख आहे. आणि त्यांत ९०००० विद्यार्थी शिक्षण ग्रहण करीत आहेत. येथें किंडर गार्डन पद्धतीनें ७,८ व ९ वर्षांच्या मुलांना शिक्षण देण्यांत येतें. तें शिक्षण इतकें उत्कृष्ट असतें कीं, त्याचें वर्णन करावें तितकें थोडेंच होणार आहे. नुसतें वर्णन करून त्याची यथायोग कल्पना

आणणें दुष्कर आहे. त्या संबंधानें इतकें ह्मणतां येईल कीं, तेथें अनेक प्रकारचें कलाकौशल्य शिकविलें जातें व त्याबरोबरच उपयोगी विषयांचें शिक्षण दिलें जातें. ह्या- शिवाय हायस्कूल्स आहेत. त्यांतला अभ्यासक्रम तीन अथवा चार वर्षांचा असतो.

## उपयुक्त सामुग्री.

हायस्कूलांत प्रवेश होईपर्यंत मुलांकडून अमेरिकेंत फी मुळींच घेतली जात नाहीं. पुस्तकें, कागद, स्लेट, कॉपी, पेन्सिल, लेखण्या, दौत वगैरे सर्व साहित्य शाळेकडून मुलांना मोफत मिळतें. कांहीं ठिकाणीं तर मुलांना भोजनही मोफत दिलें जातें. शाळेंत 'मुलें अनेक प्रकारचीं खेळणीं वगैरे बनवितात तीं त्यांनांच दिलीं जातात. ' सानडायगो ' च्या नार्मलस्कूलांत मुलें लांकडी जहाजें बनवितात. टेबलें, खुर्च्या वगैरे वस्तू मुलें आपल्या अभ्यासक्रमांत बनवितात, त्या त्यांना देण्यांत येतात. त्या ते आपआपल्या घरीं नेतात. ह्या वस्तू करण्यास लागणारा सर्व खर्च शाळेचाच असतो. मुली आपल्या टोप्या स्वतः तयार करून आपल्या घरीं नेतात. शाळेंत असतांनांच गृहकृत्यास आवश्यक असणारें सर्व प्रकारचें ज्ञान त्या उपलब्ध करून घेतात.

मुलांना शारीरिक शिक्षा करण्याचा कोणासही अधिकार नाहीं. कोणावरही सक्ती करण्यांत येत नाहीं. तेथें रजा किंवा सुट्टी देण्याघेण्याचा प्रघात नाहीं. प्रत्येक मुलास शेंकडा ७५ पर्यंत एका वर्षांत ग्रेड घ्यावयाचे असतात.

ह्मणून तीं स्वतःच शाळेची विशेष काळजी बाळगितात, आणि नियमित येतात. तेथें क्लासांत गैरहजर रहाणारा मुलगा विरळाच आढळतो. बहुतकरून सर्वच मुलें पास होतात. अभ्यासाबरोबरच क्रिडा, व्यायाम, भ्रमण ( सहल ) इत्यादिकांची व्यवस्था असते.

## कॉलेजांतील शिक्षण.

हायस्कुलांतील शिक्षणक्रम संपविल्यावर विद्यार्थी कॉलेजमध्यें प्रविष्ट होतात. अमेरिकेंत साधारण प्रतीच्या गांवांत सुद्धां कॉलेजें उघडलीं गेलीं आहेत. तेथील लोकवस्ती १० कोटि आहे, तर तेवढ्या जनसंख्येकरितां सुमारें ६०० कॉलेजें आहेत. तेथें सुमारें ४८ संस्थानें आहेत. प्रत्येक संस्थानाची स्वतंत्र युनिव्हार्सिटी आहे. ह्या विश्वविद्यालयांबरोबरच कायदा, डॉक्टरी, एंजिनियरिंग वगैरे विषयांचीं कॉलेजें आहेत. यांच्या अखत्याराखालीं नाहींत अशीं कित्येक खासगी कॉलेजें आहेत. ह्या कॉलेजांची व विश्वविद्यालयांची ओळख करून देण्याकरितां आह्मीं ह्या सर्व शिक्षणमंदिराचे दोन विभाग करितों. एक विभाग संस्थानांकडून द्रव्यसाह्य मिळविणाऱ्या विश्वविद्यालयांचा आणि दुसरा विभाग देशांतील धनाढ्य लोकांच्या आश्रयानें चालणाऱ्या विश्वविद्यालयांचा. ह्या दोन्ही विभागांतील विश्वविद्यालयांत कांहीं तफावत नाहीं. प्रत्येक वर्षास नवीन शोध व सुधारणा यांच्या बरोबरच ह्या विश्वविद्यालयांचे आकार व काया यांमध्यें परिवर्तन होत जातें. गेल्या ४० वर्षांत

जी स्थिति होती ती आजकालच्या स्थितिपुढें कांहींच नाहीं. उदाहरणार्थ, आम्हीं दोन्ही विभागांतील विश्वविद्यालयांची चालू व ४० वर्षांपूर्वींची स्थिति वाचकांपुढें मांडतों.

सुप्रसिद्ध हार्वर्ड विश्वविद्यालय–एन्डाऊड युनिव्हर्सिटी–धनाढ्य पुरुषांच्या मदतीनें चालते. इ. स. १८७५ मध्यें केवळ १७३ विषयांवर ह्या युनिव्हर्सिटीमध्यें शिक्षण दिलें जात असे. त्या वेळीं ह्या युनिव्हर्सिटीच्या ताब्यांत ( १ ) लिबरल आर्ट्स्, ( २ ) सायंटिफिक स्कूल, स्कूल ऑफ् मायनिंग, जिऑलजी, ( ३ ) कायद्याचें शिक्षण, ( ४ ) डॉक्टरी शिक्षण, ( ५ ) कृषिशास्त्राचें विद्यालय, ( ६ ) धार्मिक शिक्षणाचें विद्यालय, ( ७ ) डेन्टिस्ट्री अर्थात् दंतशाला व ( ८ ) उन्हाळ्याच्या ऋतूंतील शाळा हीं होतीं; व याशिवाय पुस्तकालय, म्युझियम, बोटेनीकल गार्डन व ज्योतिषमंदिर हीं होतीं; परंतु आतां चाळीस वर्षांनंतर ह्या विश्वविद्यालयाचें जीवन, लावण्य व तारुण्य यांचें बोधक बनलें आहे. सध्यां ह्या विश्वविद्यालयाच्या आधीन मोठमोठीं १३ विद्यालयें आहेत.

( १ ) कॉलेज ऑफ सायसेन्स आर्ट्स्.

( २ ) ग्र्याज्यूएट स्कूल ऑफ आर्ट्स् ॲन्ड सायन्सेस.

( ३ ) ग्र्याज्यूएट स्कूल ऑफ अप्लाइड सायन्सेस ह्यांत एंजिनियरिंगचें तीन विभाग सिव्हिल, मेक्यानिकल ॲन्ड इलेक्ट्रिकल असे आहेत. मायनिंगचे दोन विभाग मायनिंग व मेटलर

आहेत, व आर्किटेक्चरचे तीन विभाग अर्थात् आर्किटेक्चर, कन्सस्ट्रक्टिव्ह आर्किटेक्चर व ल्यॅन्डस् केप आर्किटेक्चर हे आहेत.

फॉरेस्टरी अर्थात् वनस्पतिविद्या.

अप्लॉइड बिऑलेजी–जडीबुटींचें शास्त्र.

( ४ ) ग्र्याज्यूएट स्कूल ऑफ बिझिनेस ॲन्ड मिनिस्ट्रेशन. यांत भिन्न भिन्न प्रकारच्या व्यवसायांचें शिक्षण दिलें जातें.

( ५ ) स्कूल ऑफ लॉ–कायद्यांच्या शिक्षणाची शाळा.

( ६ ) मेडिकल स्कूल–डॉक्टरीची शाळा.

( ७ ) ग्र्याज्यूएट स्कूल ऑफ मेडिसिन.

( ८ ) स्कूल ऑफ डिव्हीनेटी–धार्मिक शिक्षणाचें विद्यालय.

( ९ ) डेन्टल स्कूल–दंतशाला.

( १० ) स्कूल फॉर हेल्थ ऑफिसर्स.

( ११ ) स्कूल ऑफ् अग्रिकल्चर—शेतकी शाळा.

( १२ ) युनिव्हार्सिटी एक्सटेन्शन—यांत ( क ) उन्हाळ्याच्या ऋतूंत शिक्षण देण्याची व्यवस्था असते ( ख ) एज्यूकेशनल फॉर सोशल वर्क्स् ( ग ) एक्सटेन्शन वर्क हे विभाग आहेत.

( १३ ) कॉलेज फॉर उमेन—ह्मणजे स्त्रियांचें कॉलेज यांत खालील मंदिरें आहेत.

१ चेपल—गिरजा.
२ लायब्ररी—पुस्तकालय.
३ आब्झर्व्हेटरी—ज्योतिषभवन.
४ ल्याबोरेटरीज—प्रयोगशालागृहें.
५ म्युझियम—अजबखाना.
६ इन्फर्मरी.
७ युनिव्हर्सिटी प्रेस.

ह्यामध्यें सध्यां ४६७ शिक्षक आहेत. ते आपापल्या विषयाचे विख्यात आचार्य आहेत. हे सर्व शिक्षक १०५२ विषयांचें शिक्षण देतात. शिक्षणमंदिरांच्या खर्चाशिवाय या विश्वविद्यालयास ४३,६८,१०३ डॉलर ह्मणजे १,३१,०४,३१० रुपये खर्च येतो. आणि तो तेथील धनिकांकडून देण्यांत येतो. सध्यां या विश्वविद्यालयांत ५०७४ विद्यार्थी रहातात, आणि नानाप्रकारच्या विषयांचें ज्ञान गृहण करितात.

लोकांच्या आश्रयानें चालणाऱ्या एका युनिव्हर्सिटीचा हा वृत्तांत झाला. आतां आह्मीं लोकांच्या करांच्या प्राप्तीनें संस्थानाकडून चालविल्या जाणाऱ्या एका युनिव्हर्सिटीचा वृत्तांत वाचकांपुढें मांडतों. अमेरिकेंतील मिनेसोटा संस्थान ह्मणजे आपल्या इकडील बहार प्रांतच होय असें ह्मणाना. या संस्थानचें जें उत्पन्न येतें त्यांतील कांहीं विवक्षित भाग शिक्षणाकडे खर्चण्यांत येतो. आणि संस्थानच्या किंवा सर्व प्रांताच्या मुलांच्या शिक्षणाची व्यवस्था करण्यांत येते.

४० वर्षांच्या अवधींत ह्या प्रकारच्या युनिव्हर्सिट्यांच्या स्वरूपांतही महदंतर पडलें आहे. ह्या प्रांताची युनिव्हर्सिटी मिनेपॉलीज शहरांत आहे. इ. स. १८७५ मध्यें ह्या विद्यालयांत खालील विषयाचें शिक्षण दिलें जात असें.

( १ ) कॉलेजीएट डिपार्टमेंट. याचा कोर्स चार वर्षांचा असतो. ह्यांत ( क ) माडर्न कोर्स ( ख ) क्लासिकल कोर्स व ( ग ) सायंटिफिक कोर्स. असे तीन विभाग आहेत.

( २ ) कॉलेज ऑफ मेक्यानिकल आर्ट्स. हा दोन वर्षांचा कोर्स आहे; यांत सिव्हिल, मेक्यानिकल व आर्किटेक्चर, अशा तीन विषयांचें शिक्षण मिळतें.

( ३ ) कॉलेज ऑफ ॲग्रिकलचर. ह्यांत शेतकीच्या प्राथमिक शिक्षणाकरितां ४ वर्षें व युनिव्हर्सिटी आर्ट्सच्या शिक्षणाकरितां दोन वर्षें नेमिलेलीं आहेत.

ह्या सर्वांत मिळून ७८ विषयांचें शिक्षण दिलें जात असे. परंतु ४० वर्षांच्या अवधींत जगाच्या शास्त्रीय ज्ञानांत जी प्रगति झाली तिचें ज्ञान विद्यालयांत देण्याकरितां प्रत्येक वर्षांस नवीन नवीन मंदिरें व शिक्षक वाढवावे लागले; त्यामुळें सध्यां ह्या विद्यालयांत १६२२ विषयांचें शिक्षण दिलें जातें. आह्मीं भारतीय लोक १४ विद्या व ६४ कला जगांत विद्यमान आहेत असें मानीत आलों आहोंत. परंतु

आतां ती समजूत मागें गुंडाळून ठेवून पाश्चात्य राष्ट्रांकडे दृष्टि देऊन योग्य तें आचरण केलें पाहिजे. एकाद्या हिंदी मनुष्यानें वरीलसारख्या विद्यालयांत जाऊन तेथील स्थिति अवलोकिली तर तो कांहीं वेळ आश्चर्यातिरेकानें दिङ्मूढ झाल्याशिवाय राहणार नाहीं. तेथील शिक्षणपद्धति, तेथील शिक्षकाचें वर्तन वगैरे सर्वच अनुकरणीय. वाचकहो, या विषयाची जर आपणास गोडी असेल तर खालील विषयांचें अवलोकन करा, ह्मणजे यांत शिकविल्या जाणाऱ्या विषयांचें महत्व किती आहे तें आपल्या लक्षांत येऊन तेथील शिक्षणाचें खरें मर्म आपणांस कळेल.

( १ ) कॉलेज ऑफ सायन्स लिटरेचर ॲन्ड आर्ट्स्.

ह्या विभागाचे डीन डॉ० जेम्स नामक हिंदुस्थानाविषयीं प्रेमभाव बाळगिणारे गृहस्थ आहेत. ह्या कॉलेजामध्यें ८ विद्यालयें आहेत. तीं अशीं:—

( १ ) सायन्स लिटरेचर ॲन्ड आर्ट्स्.
( २ ) आर्टस् ॲन्ड म्युझिक.
( ३ ) आर्ट्स् ॲन्ड केमिस्ट्री.
( ४ ) आर्ट्स् ॲन्ड लॉ.
( ५ ) प्रिलीगल.
( ६ ) आर्ट्स् ॲन्ड मेडिसिन.
( ७ ) सायन्स ॲन्ड मेडिसिन.
( ८ ) आर्ट्स् ॲन्ड डेन्टिस्ट्री.

ह्या आठ प्रकारच्या विद्यालयांपैकीं पहिल्या प्रकारच्या विद्यालयांतच आमच्या देशांतील शिक्षणाचा अंतर्भाव होतो.

( २ ) कॉलेज ऑफ एंजिनियरिंग ॲन्ड मेक्यानिकल आर्ट्स्.

ह्या विभागांत ५ कॉलेजें आहेत:--

( १ ) सिव्हिल एंजिनियरिंग.
( २ ) मेक्यॅनिकल ,,
( ३ ) इलेक्ट्रिकल ,,
( ४ ) आर्किटेक्चर ,,
( ५ ) आर्किटेक्चरल ,,

( ३ ) डिपार्टमेंट ऑफ ॲग्रिकलचर ह्मणजे शेतकी—शिक्षण-खातें. यांत अग्रानमी एनिमल हासबंडरी, हार्टिकल्चर, प्लॅट प्यॅथालजी, एन्टोमालजी व ॲग्रिकल्चर एज्युकेशन असे भाग आहेत.

होम एकानमीमध्यें जनरल व टीचर्स ट्रेनिंग कोर्सेस आहेत.

ह्यांशिवाय मुलांकरितां कृषिविद्यालयें, मुलीकरितां विद्यालयें व एडव्हान्स कोर्सेसकरितां स्वतंत्र व्यवस्थाही आहेत. फॉरेस्टरी ह्मणजे वनस्पति विद्याही ह्या विभागांत आहे.

( ४ ) लॉ स्कूल ह्मणजे कायद्याच्या शिक्षणाची शाळा.

( ५ ) मेडिकल स्कूल ह्मणजे डॉक्टरी शिक्षणाची शाळा. ह्यांत आणखी तीन विभाग आहेत.

१ स्कूल फॉर नर्सेस.
२ स्कूल फॉर एँबाइमिंग.
३ स्कूल फॉर पब्लिक हेल्थ.

ही नांवाची शाळा आहे, परंतु हें उच्च प्रतीचें मेडिकल कॉलेजच आहे. ह्यांत ५ वर्षांच्या शिक्षणानंतर एम्. डी. ची पदवी दिली जाते.

( ६ ) डेन्टीस्ट्री कॉलेज. दंतविद्येचें हें कॉलेज अमेरिकेंतील नामांकित कॉलेजांपैकीं एक कॉलेज आहे. शेंकडों शिक्षक व विद्यार्थी हजारों मनुष्यांचे दांत बनवित असलेले दररोज दृष्टोत्पत्तीस येतात.

( ७ ) फॉर्मसी कॉलेज. यांत सर्व प्रकारचीं औषधें कशीं बनवावीं यांचें शिक्षण दिलें जातें.

( ८ ) स्कूल ऑफ् माइन्स. ह्या विभागांत मायनिंग एँजिनियरिंग मायनिंग, जी ऑलजी व मेटयालर्जी अशा तीन विषयांचें क्षिक्षण दिलें जातें.

( ९ ) स्कूल ऑफ् केमिस्ट्री.

(१०) कॉलेज ऑफ् एज्युकेशन.

(११) ग्र्याजुएट स्कूल.

(१२) एक्सिक्यूशन कोर्स. ज्यांच्या द्वारें शिक्षक लोक सायंकाळीं शाळांतून शिकवितात. शेतकऱ्यांना शिक्षण देतात. अथवा गांवोगांव जाऊन व शेतकऱ्यांना जमवून उपयुक्त विषयावर व्याख्यान देतात तो.

असा कोणताही विषय नाहीं कीं, ज्याचें दुसऱ्या कोणत्याही विद्यालयांत शिक्षण दिलें जातें व या विद्यालयांत

दिलें जात नाहीं. कृषिविद्यालयाव्यतिरिक्त इतर सर्व विद्यालयें एकाच ठिकाणीं बनविण्यांत आलीं आहेत. नदीचा देखावा, सुरम्य तट व कोमल गवत यांच्यामध्यें उद्यान व विद्यालय याचें एक नयनमनोहर दृश्य दृग्गोचर होतें. ह्या विद्यालयांत खेळाचें सर्व प्रकारचें सामान, मिलिटरी शिक्षणाची व्यवस्था व भोजनादिकांकरितां सामुग्री तयार असते. विश्वविद्यालयाकडून दोन वर्तमानपत्रें प्रसिद्ध होतात. तेथें ५३८ शिक्षक राहतात. व ५३५६ विद्यार्थी विद्योपार्जनार्थ जाऊन राहिले आहेत. ह्या ठिकाणीं एक नवीन वसलेलें सुरम्य शहरच बनलें तर त्यांत नवल तें काय ?

ह्या विश्वविद्यालयाचा निर्वाह कोणत्याही संचित द्रव्यनिधीवर होत नाहीं. प्रत्येक वर्षी संस्थानच्या उत्पन्नांतून २५,२७,६२० डॉलर ह्मणजे ७,५६,८२,८६० रुपये विद्येप्रीत्यर्थ खर्च केले जातात.

वर आह्मीं दोन विश्वविद्यालयांचा वृत्तांत वर्णन केला आहे. सर्व देशांत ४८ संस्थानें आहेत. प्रत्येक संस्थानाचें एक विद्यालय असणें अगदीं आवश्यक आहे. या हिशेबानें ४८ विश्वविद्यालयें तर असणारच. कांहीं ठिकाणीं एकाच प्रांतांत दोन विद्यालयेंही आहेत, जसें क्यालीफोर्नियांत सदर्न युनिव्हर्सिटी ल्यॉस ऍंजल्समध्यें व नार्दर्न युनिव्हर्सिटी बार्कलीमध्यें आहे. याशिवाय लहानमोठ्या शंभर युनिव्हर्सिटीज अमेरिकेंत लोकाश्रयावर चालल्या आहेत.

शिकागो युनिव्हर्सिटी राकीफेलरच्या द्रव्यनिधीवर चालते. तिचा वार्षिक खर्च ३०,६१,५३२ डॉलर आहे व तींत ३३७ अध्यापक आहेत; आणि १०,८८४ विद्यार्थी शिक्षण संपादन करीत आहेत. हे १०,८८४ विद्यार्थी हॉयस्कूलचें शिक्षण पूर्ण केलेले आहेत. ह्या शिकागो शहरांत दुसरी एक युनिव्हर्सिटीही आहे.

अमेरिकेंत अशा प्रकारें सरस्वतीचें वैभव व विद्यारूपी सुरम्य जान्हवीचा प्रवाह वेगानें वहात आहे. मोठमोठ्या धनाढ्य शहरापासून भिकाऱ्याच्या झोंपडीपर्यंत सर्वत्र शिक्षणाचीं सुगम उपकरणें प्रत्येक स्त्रीपुरुषांस उपलब्ध आहेत. उच्च प्रतीचें शिक्षण सोडून दिलें तर बाकी सर्व शिक्षण पूर्णतयः मोफत आहे. कांहीं ठिकाणीं तर कॉलेजचें शिक्षण सुद्धां मोफत दिलें जातें. प्रत्येक नागरिकाचें मूल्य, त्याची उपार्जनशक्ति, त्याची उदात्त हृदयता, त्याची उन्नत बुद्धिमत्ता व त्याचे सुविकसित अनुभव येणेंकरून संपूर्ण अमेरिका देश धनधान्याची अहर्निश वृद्धि करीत आहे. अशा प्रकारें अप्रतिहत उन्नति होत गेली तर इ० स० १९२३ पर्यंत सर्व जगांतील धननिधीचा अर्धा हिस्सा केवळ ह्या अमेरिका देशांत संचित होईल; यांत तिळप्राय शंका नाहीं.

---

# अमेरिकेंतील शाळा.

अमेरिकेंत एकंदर ४८ संस्थानें आहेत. त्यांपैकीं वाशिंग्टन हें एक आहे. याच्या मालकीचें सियेटल शहरांत एक विश्वविद्यालय आहे. त्याच्या ताब्यांत प्रायः १५० हायस्कुलें व ५ कॉलेजें आहेत.

हायस्कुलांत ५ वर्षांपासून १६ वर्षेंपर्यंत वयाचीं मुलें व मुली शिकतात. एकेका शाळेंत कित्येकशें मुलें शिकत असतात. हायस्कुलांत फी घेतली जात नाहीं; व पुस्तकें, लेखण्या, दौती, कागद वगैरे सर्व प्रकारचें जरूरीचें सामान सर्व विद्यार्थ्यांस मोफत मिळतें. प्रत्येक शाळेंत निरनिराळे वर्ग असतात. मुलांची संख्या फार असल्यास एकाच वर्गाच्या दोन तुकड्या केलेल्या असतात. कोणत्याहि वर्गांत ५० पेक्षां जास्त मुलें नसतात. एकच शिक्षक सकाळच्या ६ पासून सायंकाळचे ३ वाजेपर्यंत एका वर्गाच्या दोन्ही तुकड्याना शिकवितो. दोन्ही तुकड्यांचे विद्यार्थी एकाच हॉलमध्यें बसतात.

६ वाजण्यापूर्वीं, अर्धा तास अगोदर शाळेंत पियानो नामक बाजा वाजूं लागतो. त्याबरोबरच घंटाही वाजूं लागते. विद्यार्थीवर्ग रस्त्यावरून ह्या बाजाचा सुस्वर ध्वनि ऐकून उल्हसित होतात. ६ वाजतांच सर्व विद्यार्थी आपापल्या वर्गांत जमतात व कवायतीनें आपापल्या बसण्याच्या जागीं निघून जातात. वर्गाच्या बाहेर त्यांचे

शिक्षक त्यांचें स्वागत करतात. दरवाजाजवळ पोहोंचतांच विद्यार्थीसंघ दोन भागांत विभक्त होतो. एका बाजूस मुली व दुसऱ्या बाजूस मुलगे. मुलगे आपापल्या टोप्या व ओव्हरकोट काढून एका विवक्षित स्थळीं ठेवितात व दुसऱ्या दरवाजानें आंत जाऊन आपापल्या जागेवर बसतात. मुलीही आपापले ओव्हरकोट काढून दुसऱ्या दारानें आपल्या क्लासांत जातात. सर्व विद्यार्थी बसल्यावर शिक्षक तिसऱ्याच एका दारानें आंत जातो, आणि त्यांच्या समोर उभा राहून गाणें गाऊं लागतो. हें गाणें १५।२० मिनिटांत संपतें. नंतर अध्यापनास प्रारंभ होतो. एकच शिक्षक सर्व विषय शिकवितो. अर्ध्या अर्ध्या तासांत एकेक विषय समाप्त होतो. हे विषय ह्मणजे इंग्रजी लेखन, वाचन, हिशेब, नकाशे काढणें, ड्रॉइंग, कागद कापणें, व्यवहारिक काम, भूगोल, इतिहास इत्यादि असतात. १२ वाजण्यापूर्वी मधून मधून खेळ, गमतीचे कांहीं प्रकार, व्यायाम वगैरे होतात.

शिक्षकांची शिक्षणपद्धति फारच उत्कृष्ट असते. मुलांस फारसें पाठ करावें लागत नाहीं. तर सर्व नीट समजावून देण्यांत येतें. त्यामुळें त्यांना पक्कें ज्ञान प्राप्त होतें. शाळेचें सर्व काम शाळेंतच होतें ह्मणजे त्याकरितां घरीं कांहींच करावें लागत नाहीं.

बारा वाजल्यानंतर उपहारार्थ सुट्टी होते. ज्या मुलांचीं घरें जवळ असतात, ते घरीं जाऊन दोनप्रहरचा उपाहार उरकून येतात. परंतु जे विद्यार्थी लांब अंतरावर राहतात,

ते आपल्या घरून खाण्याचे सर्व पदार्थ सकाळींच येतांना घेऊन येतात. व ह्या वेळीं खातात.

१ वाजतां सर्व विद्यार्थी पुनः एकत्र होतात. आणि पूर्वोक्त पद्धतीनें आपापल्या बसण्याच्या जागीं जातात. ३ वाजेतोंपर्यंत पुनः अभ्यास सुरू होतो. नंतर सुटी समाप्तीची घंटा व बाजा वाजूं लागतात. तेव्हां सर्व विद्यार्थी ज्या ठिकाणीं बाजा वाजतो त्या हॉलमध्यें एकत्र जमतात. पहिली घंटा होतांच सर्व विद्यार्थी आपापलें सामान नीट सांवरतात व नंतर त्या मोठ्या दिवाणखान्यांत एकत्र जमतात. तेथून विवक्षित दरवाजांतून विवक्षित पद्धतीनें बाहेर पडतात.

खालच्या वर्गांतून थोडेच विषय शिकविण्यांत येतात. मुलांचा दर्जा जसजसा वाढतो तसतशी विषयसंख्या वाढत जाते. मुलांची मानसिक शक्ति वाढविण्याकडे विशेष लक्ष दिलें जातें. अभ्यासाव्यतिरिक्त स्वास्थ्य-रक्षण, समाज व राजनीति यांचेंही थोडेंबहुत ज्ञान मुलांना या अवस्थेंत होतें.

अशा प्रकारें ८ वर्षेंपर्यंत प्रत्येक बालक व बालिका हायस्कूलमध्यें शिकतात. अशा प्रकारें प्रत्येकानें शिक्षण घेतलेंच पाहिजे असा अमेरिकेचा कायदा आहे. ह्या आठ वर्षांत हीं मुलें आपल्या उपजीविकेकरितां लागणारा पैसा स्वतःच कमावतात. कोणी वर्तमानपत्रें विकण्याचें काम करतो, कोणी दुकानावर काम करतो, अशा प्रकारें कोणी कांहीं कोणी कांहीं व्यवसाय करून द्रव्यार्जन करितो.

शाळेंतील अभ्यासक्रम संपवून कांहीं मुली व मुलगे कॉलेजांत प्रवेश करितात; तेथेंही वरील प्रकारचीच शिक्षणपद्धति असते. अमेरिकेंत स्त्रीशिक्षणाचा प्रसार फारच झाला आहे. सर्व शाळांतून व कॉलेजांतून स्त्रियाच शिकवितात. पुरुष हें काम करीत नाहींत; कारण ते या हलक्या कामास पसंत करीत नाहींत. ते दुसरीं मोठमोठीं कामें करून विशेष लाभ करून घेऊं शकतात. जे अध्यापनाच्या कामास लायक नाहींत असे लोकही सटरफटर कामें करून शिक्षकाच्या वेतनाहून जास्त पैसे कमावूं शकतात. स्त्रिया मोठीं कामें करूं शकत नाहींत. ह्याकरितां त्या शाळांतूनच काम करितात. बहुधा सर्व शिक्षकिणी एम्. ए, बी. ए. किंवा नार्मल पास झालेल्या असतात. त्या अविवाहित राहतात. अमेरिकेंतील स्त्रिया विवाह करणें हें क्षुद्रतेचें द्योतक मानतात.

ह्या कॉलेजांतून लोहारकाम, सुतारकाम वगैरेही शिकविण्यांत येतें. मुली शिवणकाम, स्वयंपाककाम वगैरेही शिकतात. तात्पर्य काय कीं, मानसिक शिक्षणाबरोबरच शारीरिक व व्यावहारिक शिक्षण दिलें जातें.

ह्या कॉलेजांतून ४ वर्षांचा कोर्स असतो. त्यानंतर विश्वविद्यालयाचा कोर्स ४ वर्षांचा असतो. त्यांत साहित्य, कायदा, एंजिनियरी, डॉक्टरी, वनस्पतिशास्त्र, विद्युच्छास्त्र वगैरे गहन विषयांचें शिक्षण दिलें जातें. परीक्षा दर आठवड्यास होते; याशिवाय तिसऱ्या, सहाव्या, नवव्या व

बाराव्या महिन्यासही एकेक परीक्षा होते. जे शिक्षक शिकवितात तेच परीक्षा घेतात व पदव्या देतात. सियेटल विश्वविद्यालयांत गतवर्षी १२०० विद्यार्थी होते. त्यांत ५०० पुरुष व ७०० स्त्रिया होत्या. १२०० मधून सर्वच उमेदवार पास झाले. नापास कोणीच झालें नाहीं. अशा प्रकारच्या उत्कृष्ट शिक्षणपद्धतीनें शिक्षण घेऊनही कोणी नापास झालें तर ती एक आश्चर्याचीच गोष्ट होय.

---

# अमेरिकेंतील विद्यार्थी-जीवन.

" अमेरिकेंतील व्यवसायोन्नतीचा इतिहास " लिहिणारे श्रीयुत जगन्नाथ खन्ना, बी. एस्. सी. ई. ई. हे आपल्या विद्यार्थीदशेची कर्मकहाणी लिहितात:—

" माझ्या कोठडीचें भाडें दरमहा ३० रुपयेपर्यंत वाढलें आहे. मजजवळ एक डॉलर आणि तीस सेंट याशिवाय दुसरें कांहीहि नाहीं. गेल्या शनिवारीं ब्यांकेंतील शेष रक्कम काढून आणली आहे. आतां पैसे कसे मिळतील ही चिंता दत्त ह्मणून डोळ्यापुढें उभी आहे. पैसे मिळविण्याची कांहीं युक्ति काढल्याखेरीज अन्य गत्यंतर नाहीं. कारण लोकांचें कांहीं देणें द्यावयाचें आहे व निर्वाहाकरितां तर त्याची अवश्यकता आहेच.

आज डिसेंबरची १६ वी तारीख. आतां नाताळची सुटी मिळण्यास दोन दिवसांचा अवधि आहे. आतां ता.

१८ पासून १५ दिवसांची सुट्टी मिळाली तर मजूरी कोठें मिळेल ? कांहींही होवो, ह्यावेळीं द्रव्यार्जन केलेंच पाहिजे. शिवाय नाताळच्या सणानिमित्त कॉलेजांतील व बाहेरील मित्रांस भेटीदाखल कांहीं तरी पाठविलेंच पाहिजे. अर्थात्च त्याकरितां पैशाची आवश्यकता आहे.

असा विचार करीत मी कॉलेजांत गेलों. व्हरांड्यांत नोटिसबोर्डावर शहरांतील पोष्टऑफिसांत नाताळच्या सणापुरते कांहीं नोकर पाहिजे आहेत अशी जाहिरात फडकत होती. कॉलेजचे विद्यार्थी ह्या कामावर मोठ्या आनंदानें घेतले जातील असें त्यांत ह्मटलें होतें. तें वाचून माझ्या जिवांतजीव आला. लगेच मी चान्सलरच्या रूममध्यें गेलों. बाहेरच्या पहारेकऱ्यास आपल्या नांवाचें कार्ड देऊन त्याला चान्सलर साहेबांच्या जवळ पोहोंचविण्यास सांगितलें. मी जेव्हां प्रथमतःच कॉलेजमध्यें दाखल झालों होतों, तेव्हां दयाळू चान्सलर साहेबांनीं ह्मटलें होतें कीं, तुह्मांला पैशाची जर गरज लागली व त्याकरतां नोकरीची आवश्यकता असली तर मला भेटा. ह्मणूनच आज मी त्यांना भेटण्याकरितां निघालों होतों. त्यांना भेटलों व आपणास मजूरी मिळवून देण्याविषयीं विनंति केली व नोटिसबोर्डावरील जाहिरातीचीहि गोष्ट काढली. त्यांनीं मला अश्वासन दिलें व पांच डॉलर कॉलेजफंडांतून उसने देवविले व पोष्टमास्तरांच्या नांवाचें एक पत्रही लिहून दिलें.

कॉलेजचें सर्व काम संपवून चार वाजतां सायंकाळीं

मी एका ट्रामगाडीवर बसून शहरांत गेलों. पोस्टऑफिसांत जाऊन तेथील मास्तरांच्या हातीं चान्सलर साहेबांचें पत्र दिलें. पोष्टमास्तर चान्सलरांचे मित्र होते. पत्र वाचून ते खुष झाले व मला अठराव्या तारखेस येण्याविषयीं त्यांनीं आज्ञा केली.

आठराव्या तारखेस सकाळीं आठ वाजतां मी पोष्टऑफिसांत गेलों. तेथें पाहतों तों सुमारें ५०।६० विद्यार्थी पोष्टमास्तरांचे सभोंवतीं प्रतिज्ञापत्र ( डिक्लेरेशन फॉर्म ) लिहिण्याकरितां उभे आहेत. त्यांच्याबरोबर मीहि फॉर्मवर आपलें नांव वगैरे लिहिलें. तेव्हां पोष्टमास्तर एका उंच पीठावर उभे राहिले. त्यांनीं आपला हात वर उभारला व आमचे हात वर करवून आमच्याकडून "आम्ही अमेरिकन सरकारची नोकरी करीत असतां त्यांत दगाफटका करणार नाहीं" अशी शपथ घेतली. नंतर आम्हांला निरनिराळीं कामें वांटून देण्यांत आलीं. मजकडे रजिस्टरी ऑफिसांत पत्रावर शिक्के मारण्याचें वगैरे काम आलें. मी त्या कामास लागलों.

अशा प्रकारें ६ दिवसपर्यंत दररोज १० तास प्रमाणें आफिसांत काम करीत असतां अनेक नव्या नव्या माणसांशीं माझी ओळख झाली. रजिस्टरी विभागाचा सुपरिंटेंडेंट मोठा दारूबाज व आळशी माणूस होता. त्याचें वय सुमारें ५० वर्षांचें होतें. तो अगदीं अशिक्षित होता पण आपल्या कामांत हुशार होता. त्याची स्मरणशक्ति मोठी विलक्षण होती. ती इतकी कीं, एकदां त्याचेपुढें आलेलें

पार्सल पुनः कधींच गहाळ होऊं शकत नसे. पोष्टांतील दोन जुने नोकर माझे परम मित्र बनले. त्यांपैकीं एक विवाहित होता. तो नेहमीं आपल्या सहचारिणीची मनधरणी करणाऱ्या उद्योगांत असे. एकदां तर तिची समजूत करण्याकरतां तो मला आपल्या घरीं घेऊन गेला होता. तेव्हां ती स्त्री मला अगदीं स्पष्टपणें ह्मणाली कीं, माझे ते मित्र एका दुसऱ्या सुंदरीवर प्रेम करतात, ह्मणून हा घरगुती तंटा उपस्थित झाला आहे. दुसरा मित्र अद्याप कुमार होता. पण त्याचेंही एके ठिकाणीं संधान जुळलें असून मागणी घालण्यांत आली होती. तो नेहमीं आपल्या भावी स्त्रीची प्रशंसा करीत असे. तिचें सौंदर्य दाखविण्याकरितां त्यानें मलाही एके दिवशीं तिच्या घरीं नेऊन तिची भेट करविली होती.

सहा दिवसांनंतर मला पोष्टमॅनचें काम देण्यांत आलें. सकाळीं सहा वाजतां मला पोष्टांत जावें लागे. तेथें गेल्यावर आपलीं तिकिटें समयसूचक तास-मिनिट छापण्याच्या यंत्रांत छापून घ्यावीं लागत. नंतर एका गल्लीचीं पत्रें घरांच्या अनुक्रमानें लावून आपल्या ब्यॅगमध्यें ठेवीत असे. वर्तमानपत्रें व पार्सलें यांचीं पुडकीं वेगवेगळीं बांधून घेई. नंतर बनातीचा खाकी कोट घालून, पट्टा वगैरे चढवून तें ओझें खांद्यावर घेऊन ट्रामवेवर चढत असे. व त्यांतून आपल्या गल्लींत जात असे.

आपली इष्ट गल्ली येतांच ट्रामवेंतून उतरून सडकेच्या

एका बाजूची पायवाट मी सुधारत असे. अमेरिकेंतील शहरांच्या बहुतेक सडका अगदीं सरळ गेल्या आहेत. सडकांच्या दोन्ही बाजूस घरांचे कठडे आहेत. प्रत्येक कठडा दुसऱ्याशीं तुटून असतो. प्रत्येक घराच्या मागें–पुढें व दोहीं बाजूस बागशाई असते. घराच्या पुढूनच पायवाटा गेलेल्या असतात. सडकांच्या मध्यभागीं पक्क्या व रुंद सडका, ट्रामवे, मोटार, टांगे वगैरेकरितां असतात. सडकांच्या डाव्या आंगच्या घरांचे नंबर उलटे व उजव्या अंगच्या घरांचें नंबर सरळ असतात. ह्याकरितां आमच्याजवळ घरांचे नंबर असले तरी आह्मी उगीच भटकत हिंडत नाहीं. प्रायः सर्व पत्रांवर घरांचे नंबर दिलेले असतात. ह्याकरितां पत्रांचीं नंबरवार पुडकीं बांधून एक, तीन, पांच इत्यादि नंबरांच्या घरास अगोदर देत जातों. नंतर परत फिरतांना दुसऱ्या २,४,६, इत्यादि नंबरवाल्या घरास देत जातों. यामुळें काम अगदीं अल्प सायासानें व जलद होत जातें.

अशा प्रकारें मला दहा दिवसपर्यंत गल्लोगल्लीं पत्रें वांटावीं लागलीं. नाताळच्या सणामध्यें लोक आपल्या मित्रांचीं पत्रें मिळण्यास मोठे उत्सुक असतात. पुष्कळशा प्रणयी युवती आपल्या प्रियकरांचीं प्रणय–पत्रें व प्रेमसूचक भेटी मिळण्याकरितां फारच आतुर झालेल्या असतात. मी जेव्हां पत्रें वांटी, तेव्हां अशा स्त्रिया अगदीं दारावर उभ्या असलेल्या दिसत. जर का एकादीच्या नांवचें पत्र नसलें तर तिच्या चेहऱ्यावर औदासिन्याची छटा तत्काळ पसरे.

ह्या दिवसांत येथें थंडी फार कडक पडते. कधीं कधीं तर दिवसांत सकाळपासून सायंकाळपर्यंत बर्फ पडत असतें. थोडेसें चालून गेलें कीं, काळ्या ओव्हरकोटाचा रंग बर्फाच्या पतनानें अगदीं शुभ्र होऊन जातो व टोपी बर्फानें भरून जाते.

अशा प्रकारें बारा दिवसपर्यंत डाकखान्यांत काम करून मी अठ्ठेचाळीस डॉलर ह्मणजे सुमारें दीडशें रुपये मिळविले. त्यांतून घराचें भाडें चुकतें करून कांहीं शिल्लकही मागें टाकिली.



# अमेरिकेंतील प्रचंड कन्या-विद्यालय.



## ( आयर्व्हिंग गर्ल्स हायस्कूल. )

सध्यांच्या काळांत शिक्षणविषयींची लालसा प्रत्येक मनुष्याच्या मनांत उद्भूत झाली आहे असें दृष्टोत्पत्तीस येतें. मुलांच्या शिक्षणाची व्यवस्था करण्याचा प्रयत्न प्रथमपासूनच होत आला असल्यामुळें त्यांच्याकरितां आज अनेक शाळा स्थापन झाल्या आहेत—होत आहेत; आणि त्या दिवसेंदिवस अशाच वाढत जाणार. परंतु आपल्या समाजाच्या विचित्र परिस्थितीमुळें मुलींचें शिक्षण अथवा सामान्यत: बोलावयाचें ह्मणजे 'स्त्रीशिक्षण' ह्या विषयाकडे बऱ्याच अंशीं कानाडोळा करण्यांत आला आहे. परंतु पाश्चात्य संस्कृतीच्या परिणामामुळें ती स्थिति आतां नष्ट

होत आहे ही समाधानाची गोष्ट आहे. संसाररूपी गाडीचीं स्त्री व पुरुष हीं दोन चक्रें आहेत. पैकीं एकच चक्र-( पुरुष ) ह्याकडेच आजपर्यंत सर्व लक्ष पुरविण्यांत येत होतें, ती दृष्टि बदलून आतां सर्व जनतेचें लक्ष ह्या दोन्ही चक्रांकडे आकृष्ट होत आहे. त्याबरोबरच स्त्रियांना कोणतें शिक्षण द्यावें ? त्यांना पुरुषांप्रमाणेंच शिक्षण देणें इष्ट कीं अनिष्ट ? इत्यादि प्रश्न उत्पन्न होत आहेत. त्याचा योग्य विचार होऊन यथायोग्य पद्धति अमलांत येणें आवश्यक आहे. या बाबतींत अमेरिकन लोकांनीं चांगलीच आघाडी मारली आहे. त्यांनीं मुलींच्या शिक्षणाकरितां कित्येक मोठ-मोठीं विद्यालयें उघडलीं आहेत, त्यांपैकीं एका प्रचंड विद्यालयाची ओळख आतां वाचकांस करून द्यावयाची आहे.

अमेरिकेंतील न्यूयॉर्क शहरांत " वॉशिंग्टन आयर्व्हिंग हायस्कूल " नामक एक मोठी कन्याशाळा आहे. त्या शाळेंत मुलींना उपयोगी अशा विषयांचें त्यांना समजेल अशा भाषेंत शिक्षण देण्यांत येतें. ही शाळा जगांतील इतर सर्व मुलींच्या शाळांपेक्षां मोठी आहे. तींत सहा हजारपेक्षां जास्त मुली शिकत आहेत.

कांहीं वर्षांपूर्वीं ही शाळा ' गर्ल्स बायब्लीकल हायस्कूल ' ( मुलींना बायबलचा धर्मग्रंथ शिकविणारी शाळा ) ह्या नांवानें प्रसिद्ध होती. त्या वेळीं तेथें फक्त स्वयंपाकाचें आणि शिवणकामाचें शिक्षण देण्यांत येत असे. तेव्हां त्या शाळेची स्थिति अगदीं साधारण होती. त्या वेळीं तींत

एक हजार मुली होत्या. त्यानंतर मेक अँड्रू नामक एका गृहस्थांची ह्या शाळेच्या मुख्य अध्यापकाच्या ठिकाणीं नेमणूक करण्यांत आली. त्यांचा स्त्रीशिक्षणाविषयीं असा अभिप्राय होता कीं, स्वराज्याची पात्रता मुलींमध्यें वास करते. शाळा काढावयाच्या त्या कांहीं मुलींना केवळ लिहिणें वाचणें शिकविण्याकरितां अथवा मास्तरकी करण्याकरितां किंवा शाळाखात्याकरितां अथवा त्यांच्या अभ्यासपत्रकांकरितां काढावयाच्या नाहींत ! तर त्यांना योग्य माता बनविण्याकरितां काढावयाच्या आहेत. हे अध्यापक ह्या शाळेंत दाखल झाले तेव्हां शाळेंतील सर्व शिक्षक अभ्यासपत्रकाबरहुकूम काम करणारे आहेत असें त्यांना आढळून आलें. तें पाहून मुलींना जे विषय खरोखरच भावी आयुष्यांत अत्यंत आवश्यक व उपयोगी पडणारे असतील, त्यांचेंच त्यांना शिक्षण द्यावें असें त्यांनीं ठरविलें. त्याचाच परिणाम पूर्वोक्त शाळेचें रूपांतर होऊन बनलेलें सांप्रतचें विद्यालय होय. ह्या शाळेची इमारत नवीनच बांधण्यांत आली आहे. हींत आठ लायनी आहेत. ही प्रचंड इमारत बांधण्याच्या कामीं सर्व परिश्रम मुलीनींच स्वतः केले आहेत. निरनिराळ्या लोकांस पत्रें लिहून, त्याच्या समक्ष गांठी घेऊन, व फंड उभारून सर्व रक्कम जमविण्यांत आली व त्यानें हें प्रचंड विद्यालय उभारलें गेलें; त्या कामीं सुमारें पंधरा लाख डॉलर खर्च आला.

शाळेच्या मंदिरांत प्रवेश करतांच प्रथमतः शीत निवारक “ शेगडी-घर ” लागतें. त्यावर “ ब्रेस ब्रिज हॉल ”,

नासह्न पुस्तकांतील अतिथ्यस्वागत दर्शविणारें एक सुंदर वाक्य लिहिलें आहे. ह्या वाक्याचा भावार्थ असा आहे कीं, " आतिथ्यांत शेगडी आणि निष्कपटी अंत:करण हीं आवश्यक आहेत."+ ह्या उक्तीचा भावार्थ तेथील मुलींच्या वर्तनांत ओतप्रोत भरलेला आढळतो. त्या मोठ्या दयाळू आणि आनंदी प्राणी आहेत. कोणीहि मनुष्य केव्हांही तेथें जाऊन पाहील तर त्यास त्या मुली गुण्यागोविंदानें आमोद-प्रमोद करीत आहेत, किंवा एकत्र बसून शिवणकाम करीत आहेत; अथवा वाचीत बसल्या आहेत असें आढळून येईल.

ह्या शाळेच्या १६० कक्षा ( खोल्या ) आहेत. त्यांची व्यवस्था अप्रतिम असते. पाहणाराला तें दृश्य अवलोकन करून आल्हाद होतो. ह्या शाळागृहाशिवाय नाटकगृह, अंतरिक्षांतील हलतें उद्यान, पशुसंग्रहालय, पदार्थसंग्रहालय, दुकान, ब्यँक, फोटो घेण्याची जागा व अशाच प्रकारचीं आणखीं विविधविषयक दुसरीं भुवनें त्या शाळेच्या मालकीचीं आहेत. नाटकगृहांत रंगभूमि, पडदे व नानाप्रकारचे देखावे यांचा संग्रह हीं आहेत. तेथील पदार्थसंग्रहालय ह्मणजे लहानशा प्रमाणावर " राणीचा बाग " च आहे. असें ह्मणण्यास हरकत नाहीं. त्याच्या साह्यानें मुलींस पशुपक्ष्यांसंबंधीं माहिती दिली जाते. अंतरिक्षांतील हलत्या उद्यानाच्या साह्यानें वनस्पतिशास्त्रासंबंधीं

---

+ ज्या देशांत कडक थंडी पडते, तेथें शेगडीसमोर बसविणें हें पाहुण्याच्या सन्मानाचें द्योतक चिन्ह समजलें जातें.

माहिती देण्यांत येते व उपहारप्रसंगीं आणि जलसा वगैरे करण्याच्या वेळींही त्याचा उपयोग करण्यांत येतो. शाळेंतील समारंभप्रसंगीं गायनाचें सर्व कार्य मुलीच करतात. त्याचें शिक्षण देण्याची सर्व व्यवस्था विद्यालयांत करण्यांत आली आहे.

**गृहकृत्यः**—शिकविण्याकरितां एक नमुनेदार स्वतंत्र वर्ग आहे. त्यांत बसण्याउठण्याचा एक भाग, एक शयनगृह, एक शिशुगृह, भोजनगृह, स्वयंपाकगृह, सामानाचें कोठार आणि स्नानगृह वगैरे आहेत. ह्या सर्व खोल्या एकाच कायनींत आहेत. त्यामुळें सर्व मुलींना एकाच वेळीं भिन्न भिन्न विषयांचें शिक्षण देण्याचें काम सहजगत्या उरकतां येतें.

शाळेमध्यें लेखन, वाचन, आणि गणित या विषयांचें जरूरीपुरतें शिक्षण देण्यांत येतें. गृहकृत्य आणि गृहशास्त्र ह्या विषयाचेंही शिक्षण देण्यांत येतें. ह्या कामीं एका स्त्रीशिक्षकेची योजना करण्यांत आली आहे. ती एकाच वेळीं पंचवीस मुलींना शिक्षण देते. स्नानाच्या वेळीं स्नानापासून आरोग्यदृष्ट्या काय काय फायदा होतो, तें सांगण्यांत येतें. आणि स्नानगृहाची रचना कशी असली पाहिजे ? तें कसें बांधणें आवश्यक आहे ? तसेंच तें स्वच्छ कसें राखावें ? ह्या सर्व विषयांचें ज्ञान देण्यांत येतें.

**स्वयंपाकघर**—पाकशाळेंत शिक्षण देतांना अन्नाच्या विषयाचें ज्ञान देणारी स्त्री-शिक्षका मुलींना बरोबर घेऊन त्यांना त्याचें सप्रयोग शिक्षण देते. स्वयंपाकघर कसें बांधावें ? त्यांत काय काय पदार्थ ठेवावे आणि ते कशा

नामक प्रकारें जमवावे ? कोळसा, लांकडें, तेल, ग्यॅस आणि विद्युच्छक्ति यांच्या साह्यानें स्वयंपाक कसा बनवावा ?—वस्तूंची खरेदी कशी करावी ? मिष्ट आणि पौष्टिक अन्नाची निवड कशा प्रकारें करावी ? तसेंच त्यांमधील पौष्टिक भाग निरर्थक जाऊं न देतां ह्या वस्तू कशा शिजवाव्या ? वगैरे गोष्टी उत्तम प्रकारें शिकविल्या जातात. तशाच प्रकारें, भोजनगृह आणि कोठार कसें ठेवावें ? भांडीं स्वच्छ कशीं ठेवावीं ? तीं व्यवस्थित कशीं राखावीं ? भोजनस्थान हवेदार, प्रकाशयुक्त आणि स्वच्छ कसें ठेवावें ! तसेंच तें सुशोभित कसें बनवावें ? वगैरे बाबींचें मुलींना या ठिकाणीं शिक्षण दिलें जातें.

घरांतील अंतर्व्यवस्था आणि घराचें अंतरंग स्थान कसें असलें पाहिजे ? बसण्याउठण्याचें ठिकाण शांत, स्वच्छ आणि रमणीय कशा प्रकारें बनवावें ? तेंही ह्या ठिकाणीं शिकविण्यांत येतें. घरांत पियानो ( एक प्रकारचा वाजा ) असेल, तर तो कशा प्रकारें राखावा तें प्रत्यक्ष दाखविण्यांत येतें.

शयनगृहाविषयीं शिक्षण देतांना स्वच्छ व खुली हवा, तसेंच प्रकाशाचें महत्व, यांची योग्य कल्पना दिली जाते. तसेंच बिछाना कसा असला पाहिजे ? चादर, पलंग वगैरे कशा प्रकारें स्वच्छ ठेवावेत, आणि आजारी माणसांच्या शयनाची व्यवस्था कशा प्रकारें ठेविली पाहिजे. तें सर्व तेथें शिकविण्यांत येतें.

शिशुगृह ( नर्सरी ) मध्यें बालकाची जोपासना कशा प्रकारें केली पाहिजे तें प्रत्यक्ष दाखविण्यांत येतें. शाळेंतील

स्त्रियांच्या घरांतील लहान मुलांमुलींना शाळेंत आणून त्यांना दोन तीन दिवस शाळेंत ठेवून घेऊन, शिशुगृहां-तील व्यवस्थापक बाईच्या प्रत्यक्ष देखरेखीखालीं मुलांना स्नान कसें घालावें ? त्यांना कसें ठेवावें ? त्यांना कशा प्रकारें खेळवावें ? आणि कशा प्रकारें त्यांचा सांभाळ करावा तें सर्व प्रत्यक्ष दर्शनानें शिकविण्यांत येतें.

अशा प्रकारची व्यवस्था ह्या शाळेंत आहे. शाळेच्या सुव्यवस्थेचा परिणाम चांगला फलप्रद होतो. ह्या शाळेंत शिक्षण मिळविलेली मुलगी प्रत्यक्ष मातेपेक्षांही बालकाचा सांभाळ जास्त चांगल्या प्रकारें करते, आणि त्यापासून त्या बालकांच्या आयांनाही चांगलें शिक्षण मिळतें. याचा परि-णाम आतां असा झाला आहे कीं, बालकांचा प्रतिपाळ कसा करावा याचें शिक्षण मिळालेल्या आया देशांत बऱ्याच प्रमाणावर तयार झाल्यामुळें अमेरिकेंतील बालमृत्यूची संख्या दिवसेंदिवस कमी होत आहे.

---

# अमेरिकेंतील तीन प्रख्यात शहरें.

## १ सियेटल नगरी.

" सियेटल " वाशिंग्टन स्टेटमधील मोठें प्रख्यात शहर आहे. याच्याशीं तुलना करतां येईल असें हिंदुस्थानांत एकही शहर नाहीं. हें शहर समुद्राच्या कांठीं वसलेलें असून त्यांतील उंच-नीच गल्ल्या व सुंदर कालवे यांनीं तें

अत्यंत मनोहर दिसतें. ह्या शहराच्या पश्चिमेस चार मैल लांब व दोन मैल रुंद इलियट नामक कालवा आहे. ह्या कालव्याच्या द्वारेंच सियटलचें समुद्रांतून दळणवळण चालतें. चीन, जपान, हिंदुस्थान वगैरे लांबलांबच्या देशांतील लोकांनीं भरलेलीं स्टिमरें ह्या कालव्यांत येतात व ह्याच्यांतून सियेटलचा क्रोडों रुपयांचा माल देशदेशांतरीं विक्रीस रवाना होतो.

शहराच्या पूर्वेस अठरा मैल लांब व दोन चार मैल रुंद वाशिंग्टन नामक कालवा आहे. ह्याच्या कांठचे हिरवेगार वृक्ष व त्या मागील सुंदर घरें यांनीं अत्यंत मनोहर देखावा दिसतो. शहराच्या मध्यभागीं "युनियन लेक" व "ग्रीन लेक" नामक दोन लहान कालवे आहेत. यांच्या दुतर्फा मोठमोठ्या धनाढ्य लोकांचे प्रचंड प्रासाद व मोठमोठीं मंदिरें आहेत. त्या रंगीबेरंगी लांकडी इमारती पाहून मन उल्हसित होतें. दररोज सकाळ संध्याकाळ सियेटलमधील युवयुवति व रंगेल लोक त्या कालव्यांतून क्रीडा करून स्वच्छ हवेचा लाभ घेतात.

### २ टकोमा.

टकोमा एक लाख वस्तीचें शहर आहे. याची लोकसंख्या दिवसेंदिवस वाढत आहे. हें शहर समुद्राच्या कांठीं वसलेलें असल्यामुळें लांकडें आणण्याची मोठी सोय झाली आहे. वाशिंग्टन स्टेटच्या जंगलांतून थेट या शहरांत लांकूड येतें व तें कापून त्याचा माल बनविण्यांत येतो तो देश-

देशांतरीं रवाना होतो. हें शहर एका डोंगरावर वसलें आहे. विजेच्या गाड्या सर्व शहरांतून पळत असतात. या शहरांत दुराचार फार आहे. मजूर लोक जे पैसे मिळवितात ते अगदीं पाण्याप्रमाणें वाईट कामांत खर्च करतात. शहरांत दारूचीं दुकानें तर फारच आहेत. हा पाश्चात्य सुधारणेचा महिमा आहे. याचा प्रताप अमेरिकेंतील शहरोशहरीं असल्याचें आढळून येतें.

टकोमा एका खाडीवर वसलें आहे. एका लहानशा डोंगरावर वसलेलें, सुंदर घरांनीं विभूषित व विद्युत्प्रकाशानें अलंकृत असें हें शहर पाहून आनंद वाटतो. आधुनिक शास्त्रीय पद्धतीवर वसलेलें हें शहर पुढें मागें मोठें प्रचंड शहर होईल. कारण जवळ पाणी आहे व त्यांत बोटी येऊं जाऊं शकतात. यामुळें याचा व्यापार बराच मोठा आहे. येथील माल थेट जपान व चीन देशांत जातो. लांकूड, धान्यें, कापूस व दुसरे पदार्थ आशियांतील अन्य देशांतही जातात.

ह्या शहरांत पिठाच्या मोठमोठ्या गिरण्या आहेत. त्यांत लाखों मण धान्य दळलें जातें व देशदेशांतरीं रवाना होतें. शिवाय या शहरांत लांकडाच्याही मोठमोठ्या वखारी आहेत. धातू शुद्ध करण्याचे कांहीं कारखाने आहेत. त्यांत एलास्का, क्यानडा, आरेगान वगैरे ठिकाणच्या खाणींतून निघालेल्या मिश्रित धातू शुद्ध केल्या जातात.

येथील लोक गब्बर आहेत. ही गोष्ट शहराकडे नुसतें

शहरांच ध्यानांत येतें; परंतु पाश्चात्य सुधारणेचा कुप्रभाव येथें फार दृग्गोचर होतो.

३ पोर्टल्यॉंड.

हें शहर ओरेगान संस्थानची राजधानी आहे. याची लोकवस्ती सुमारें अडीच लाख आहे. समुद्रकांठीं वसलेल्या अमेरिकेंतील सर्व शहरांत हें शहर अप्रतिम आहे. हें ज्या ठिकाणीं वसलें आहे तेथें मोठमोठीं जहाजें येऊं शकतात. येथून १२० मैलांवर महासागर आहे, तरी पोर्टल्यॉंडच्या रहिवाशांना तो आपल्या अगदीं जवळ आहे असें वाटतें. याच्या जवळील नदीच्या पाण्याची खोली बरीच मोठी असल्यामुळें समुद्राच्या अगदीं कांठच्या शहराप्रमाणें तेथें सर्व सोयी अनुकूल आहेत. ज्यांना जपान, चीन किंवा हिंदुस्थान या देशास जावयाचें असेल ते पोर्टल्यॉंडमध्यें स्टीमरावर आरूढ होऊन आपल्या निर्दिष्ट स्थळीं पोहोंचूं शकतात. ह्या शहरांत जगांतील सर्व प्रकारच्या पदार्थांचा क्रयविक्रय होतो. ह्याच्या बंदरांत प्रायः सर्व जातीचे स्टीमर आपापले झेंडे फडकावीत असलेले दृष्टोत्पत्तीस येतात.

या शहराची उन्नति अत्यंत शीघ्रतापूर्वक झाली. इ. स. १९०० मध्यें ह्याची लोकसंख्या ९९,००० होती; परंतु आतां १० वर्षांच्यां अवधींत ती अडीच लाखांवर गेली आहे. इतकी प्रगति होण्याचें कारण पोर्टल्यॉंडचा संबंध विलामेट व कोलंबिया या दोन नद्यांशीं असल्यामुळें ह्या दोन नद्यांच्या तीरावर असणाऱ्या सर्व शहरांशीं ह्याचा

संबंध जडला आहे हें होय. देशांत उत्पन्न झालेला जो जो माल ह्या शहरांतून येतो तो तो सर्व थोड्याशा भाडे-खर्चानें पोर्टल्यॅंमध्यें येऊन तेथून देशदेशांतरीं रवाना होतो. यामुळें दुकानदार व शेतकरी दोघेही अधिक खर्चापासून बचावतात. दुसरें, पोर्टल्यॅंड रेल्वेचें मोठें प्रचंड जंक्शन आहे. न्यूयॉर्क, शिकागो, सेंटपाल, ओमाहा, साल्टलेक सिटी, वेंकोवर बी. सी., सानफ्रान्सिस्को वगैरे शहरांशीं रेल्वेद्वारें याचा संबंध आहे. सदर्न पॅसिफिक कंपनीचा हें शहर अड्डा आहे. येथें प्रवाशांच्या सर्व प्रकारच्या सोयी असल्यामुळें ह्याची लोकसंख्या दिवसेंदिवस वाढत आहे.

शहरांतून रस्तोरस्तीं विजेच्या गाड्या धांवत असतात. आसपासच्या खेड्यापाड्यांशीं व मोठमोठ्या गावांशींही याचा संबंध आहे. दोन चार आणे दिले कीं, तेथील लोकांस शहरांत येतां येतें.

ह्या शहराचें सौंदर्य प्रेक्षणीय आहे. सुंदर सुंदर उत्तुंग मंदिरें, त्यांवरील चित्ताकर्षक रोषनाई व प्रशस्त पक्क्या सडका यांनीं प्रेक्षकांचें मन मोहित होऊन जातें. शहराच्या आसपासच्या डोंगरांचें दृश्य मोठें मनोहर आहे. पर्वतांचीं हिमाच्छादित शिखरें शहरांतून दृष्टीस पडतात. ह्या पर्वतां-मुळें व समुद्रावरून येणाऱ्या वायुलहरींमुळें पोर्टल्यॅंडची हवा मोठी मजेदार व आरोग्यास हितावह अशी आहे.

शहरांत शिक्षणाची व्यवस्थाही उत्कृष्ट आहे. कांहीं चांगलीं चांगलीं हायस्कुलें आहेत, पुस्तकालयें आहेत,

हास्पिटलें आहेत, दोन चार कॉलेजें आहेत. प्रतिवर्षी जून महिन्यांत ह्या शहरांत एक मोठा उत्सव होतो. त्याला Rose Festival ह्मणजे पुष्पोद्यान ह्मणतात. ह्या उत्सवांत पुष्पांची रेलचेल असते. घरें, दारें, हवेल्या, दुकानें, गाड्या, सडका इत्यादि सर्व कांहीं गुलाबाच्या फुलांनीं शृंगारलेलीं असतात. लांबलांबच्या ठिकाणाहून लोक हा मेळा पाहण्यास येतात. ह्या वेळीं सर्व शहरभर मोठी धामधूम माजून राहते व जिकडे पहावें तिकडे आमोद-प्रमोदाचे व ख्यालीखुशालीचे प्रकार चाललेले दृष्टोत्पत्तीस येतात.

---

## वाशिंग्टन स्टेट.



वाशिंग्टन संस्थान युनायटेडस्टेट्सच्या उत्तर-पश्चिम भागास आहे. याच्या उत्तरेस ब्रिटिश कोलंबिया, दक्षिणेस आरेगान संस्थान, पूर्वेस इडाहो संस्थान व पश्चिमेस प्रशांत महासागर आहे.

ह्या संस्थानांत कसकडे नामक पर्वतश्रेणी उत्तरेकडून दक्षिणेकडे गेली आहे. त्याचा एक तुरळक फांटा पश्चिमेस असल्यामुळें हें संस्थान दोन भागांत विभक्त झालें आहे. ह्या पर्वतश्रेणींत मौंट टेनियर १४,३६३ फूट, मौंट आदम्स १२,४७० फूट, मौंट बेकर १०,८२७ फूट व ग्लेशियर १०,४३३ फूट उंच आहे.

ह्या पर्वतावळीच्या व प्रशांत महासागराच्या प्रभावामुळें ह्या संस्थानाच्या पूर्व व पश्चिम भागाच्या ह्या हवामानांत मोठी तफावत आहे. कोठें फारच उष्णता असते तर कोठें अगदीं सर्द हवा असते. पश्चिम भागांत पाऊस फारच पडतो. हा पश्चिम भाग चांगला सुपीक आहे. यामुळें तेथें शेतकीचें मोठें उत्पन्न येतें.

वाशिंग्टन संस्थानांत दगडी कोळशाच्या खाणी मुबलक आहेत. इ. स. १९०७ मध्यें ह्या खाणींतून ३,६०,५६२ टन कोळसा निघाला होता. त्याची किंमत सुमारें २,३०,३९,४०३ रुपये होते. दगडी कोळशाशिवाय सोनें, रुपें, तांबें व जस्त यांच्याही ह्या संस्थानांत खाणी आहेत. अलीकडे लोखंडाच्याही कांहीं खाणी सांपडल्या आहेत.

या संस्थानांत मोठमोठीं जंगलें आहेत. कसकडे डोंगराच्या पूर्व भागांत तसेंच कोलंबिया नदीच्या उत्तरेस देवदारादि झाडांचीं बिकट अरण्यें आहेत. ह्या पर्वतांच्या पश्चिम भागांत “ फर ” वृक्षांचीं अरण्यें ४००० फुटांच्या उंचीपावेतों अंतरिक्षांत गेलीं आहेत व समुद्रापर्यंत त्यांचा फैलाव झाला आहे.

ह्या संस्थानास माशांच्या व्यापारापासून फारच फायदा होतो. त्यांचा तेथें मोठा व्यापार चालतो. इ. स. १९०४ मध्यें ह्या व्यापारांत १,५९,५७,६०३ रुपये भांडवल गुंतलें होतें व नऊ हजार मजुरांची उपजीविका या व्यवसायांत होत होती. त्या सालीं ३० लाख डॉलरांचे मासे विकले

गेले. एक डॉलर ह्मणजे तीन रुपये मानले तर ९० लाख रुपयांचे मासे खपले असें दिसून येईल. हे मासे टीनच्या पत्र्यांत बंद करून बाहेरदेशीं पाठविले जातात.

शेतकीचे वर्णन काय करावें ? हें संस्थान सर्व जगांत शेतकीकरितां महशूर आहे. इ. स. १९०८ मध्यें मक्कई, गहूं, जवस, आळू वगैरे सर्वांचें मिळून सुमारें १३ कोटि रुपयाचें उत्पन्न निघालें !

तेथें गव्हाचे दोन हंगाम आहेत. एक सरदीच्या दिवसांत व दुसरा वसंतऋतूंत. स्नेक नामक नदीच्या दक्षिण भागांत, तसेंच स्पोकेन नामक नदीच्या कांठीं गव्हाचें उत्पन्न हंगामाव्यतिरिक्त व पेरणी केल्यावांचून आपोआप होतें. या संस्थानांत अलफालफा नामक गवताची उपज फार होते. त्याची लागवड आमच्या इकडे शेतकरीवर्ग करील तर पुष्कळ फायदा होईल.

अमेरिकेंत घोड्यांच्या द्वारें शेतकी होते. गाई दुधाकरितां व बैल मांसाकरितां पाळतात. शेतकीकरितां घोड्यांची विशेष जरूरी असल्यामुळें शेतकरी लोक घोडेही पाळतात. परंतु बैल, मेंढरें व डुकरें यांचा खप विशेषतः असल्यामुळें तींही पाळलीं जातात. यांपासूनही लाखों रुपयांचें उत्पन्न होतें.

वाशिंग्टन संस्थानांत गिरण्या व कारखाने पुष्कळच आहेत व पाण्याच्या जोरानें पाणचक्क्या चालविण्याचीही विपुल सोय आहे. ज्या ज्या ठिकाणीं नदी जवळ आहे त्या ठिकाणीं कारखाने उघडण्यांत आले आहेत.

## शिक्षणाची व्यवस्था.

संस्थानच्या तर्फेनें एक स्टेट सुपरिंटेंडेन्ट शिक्षण-विभागाकरितां निवडला जातो. तो चार वर्षें राहतो. संस्थानच्या गव्हर्नरकडून व सेनेटकडून त्याला चार मदतगार नेमण्यांत येतात. या पांच जणांच्या मंडळीस "स्टेट बोर्ड ऑफ एज्यूकेशन" ह्मणतात. प्रत्येक कौन्टीमध्यें आपापल्या सुपरिंटेंडेंटची निवडणूक स्वतः लोकच करितात. तो दोन वर्षेंपर्यंत अधिकारारूढ राहतो. प्रत्येक जिल्ह्यांत तीन वर्षांकरितां तीन डॉक्टरांची निवडणूक होते. हें सर्व लोकांच्याच हातीं आहे. जिल्ह्याचे डायरेक्टर योग्य त्या शिक्षणाची व्यवस्था करतात. वर्षांतून कमींत कमी सहा महिने शाळा उघड्या राहतात. ६ वर्षांच्या मुलांपासून तों २१ वर्षांच्या तरुणांपर्यंत या शाळांतून शिक्षण संपादन करीत असतात. ८ वर्षांच्या वयापासून १५ वर्षांच्या वयाच्या मुलांना शाळेत शिक्षण घ्यावयास जाणें भाग पडतें. मोठ्या गांवांतून हायस्कूलें उघडण्यांत आलीं आहेत.

ह्या व्यवस्थेचा असा परिणाम झाला आहे कीं, इ. स. १९०० च्या खानेसुमारींत दहा वर्षांच्या वयाच्या मुलांत केवळ शेंकडा ३ मुलें अशिक्षित निघालीं. इ. स. १९०७ मध्यें ६ वर्षांपासून २१ वर्षांपर्यंतच्या विद्यार्थ्यांची संख्या २३५०६१ होती, व शिक्षकांची संख्या ६२०९ होती. त्यांत केवळ स्त्रियांची संख्या ४,९५२ होती. संस्थानाकडून केवळ शिक्षणाकरितां ५५,०३,८९६ डॉलर खर्च करण्यांत आले होते.

संस्थानच्या मालकीचें एक मोठें प्रचंड विश्वविद्यालय सियेटलमध्यें आहे. व एक कृषिकॉलेज पुलमेन नामक शहरांत आहे. ह्या दोन भारी विद्यालयांशिवाय आणखींही कांहीं कॉलेजें निरानिराळ्या शहरांत असून तीं लोकांच्या वर्गण्या व धनाढ्य लोकांच्या उदार देणग्या यांच्या द्वारें चाललीं आहेत.

अमेरिकेंतील दानपद्धति आमच्यापेक्षां अगदीं भिन्न आहे. आमचे इकडे पुण्यक्षेत्रांत राहणाऱ्या गलेलठ्ठ भिक्षुक-पेशा लोकांस पोसण्यांतच सर्व इतिकर्तव्यता समजली जाते. परंतु अमेरिकेंत याच्या अगदीं उलट आहे. तेथें त्यांच्या द्वारें वेड्यांचीं इस्पितळें, शाळा, अनाथालयें किंवा धंदे-शिक्षणाच्या शाळा वगैरे उघडण्यांत येतात व त्या चाल-विल्या जातात.

वाशिंग्टन संस्थानांत सियेटल, टकोमा, स्पोकेन व वालावाला इत्यादि प्रसिद्ध शहरें आहेत.

## सेलम

सेलम हें शहर ऑरेगॉन संस्थानची राजधानी आहे. विलामेट दरीच्या ऐन मध्यावर हें वसलेलें असल्यामुळें येथें नगरवृद्धीचें सर्व साहित्य विद्यमान आहे. येथील हवा-मान आल्हाददायक आहे. याच्या आसमंताद्भागाची भूमि फारच सुपीक आहे. सभोंवतालचा देखावाही रम्य व मनो-हर आहे. जेव्हां आकाश निरभ्र असतें तेव्हां पर्वताचीं पांच शिखरें, हिमाच्छादित असलेलीं दुरून फारच सुंदर दिसतात.

ह्या शहराची लोकसंख्या १८,००० आहे. त्याच्या सडका व गल्ल्या फारच रुंद व फलभारानें लवलेल्या वृक्षांनीं शोभायमान अशा आहेत. कांहीं सडका तर शंभर फूट रुंदीच्या आहेत. घरांच्या आसपासही फलयुक्त वृक्ष आहेत.

शहरांतील मोठमोठ्या इमारती पाहण्यालायक आहेत. राजधानीची मुख्य इमारत ह्मणजे " क्यापिटल बिल्डिंग " अत्यंत प्रेक्षणीय आहे. ही इमारत बांधण्यास तीस लाख रुपयांहून जास्त खर्च झाला आहे. इमारत मोठी प्रचंड आहे. हिच्या आंत एक मोठें ग्रंथसंग्रहालय आहे.

शहरांत आणखीही कांहीं प्रेक्षणीय इमारती आहेत. त्यांत " फिडरल–बिल्डिंग " ही एक विशेष उल्लेखयोग्य इमारत आहे. ही इमारत बांधण्यास साडेतीस लाख रुपये खर्च झाले आहेत. शहरांत कोर्टाची एक प्रचंड इमारत आहे, तिलाही इतकाच खर्च आला आहे. सिटी-हॉल बांधण्यास अडीच लाख रुपये खर्च झाले आहेत. शहरांत एक मोठें हायस्कूल आहे. तें बांधण्यास दोन लाख पंचवीस हजार रुपये लागले आहेत. दुसऱ्या लहान लहान शाळा आहेत, त्यांना कांहीं लाख रुपये खर्च झाले आहेत. येथें एक विलामेट युनिव्हर्सिटी ह्मणून विश्वविद्यालय आहे. यांशिवाय कित्तीएक उपयोगी पाठशाळा आहेत. त्यांतून आंधळे, बहिरे, लुले, पांगळे व बोबडे मुलगे व मुली शिकतात. एक सुधारक-विद्यालय आहे, त्यांत उच्छृंखल मुलें ठेवण्यांत येतात. ऑरेगॉनच्या अस्सल रहिवाशांकरितांहि एक " गव्हर्नमेंट इंडियन ट्रेनिंग स्कूल " नामक शाळा आहे.

सेलम शहराच्या आसमंताद्भागांत फळांची अगदीं रेल-चेल आहे. सेब, नाशपाती, बोरें, करौंदा, सफरचंद, आक्रोड, द्राक्षें इत्यादिकांची विपुल पैदास होते. सेलम शहरांत चेरी नामक फळांची पुष्कळ पैदास होते ह्मणून त्याला " चेरी सिटी " ह्मणतात. चेरी नामक फळें निरनिराळ्या रंगाचीं आहेत. हीं खाण्यांत आंबट-गोड व निव्वळ गोड अशीं दोन प्रकारचीं लागतात. हीं दिस-ण्यांत थेट आलू ( बटाट्या ) सारखीं असतात. ह्याची गांठ आलूप्रमाणेंच असते; पण आलू ह्याहून जरा मोठा असतो. ह्यांच्या रंगांत वैचित्र्य आहे. लाल, पांढरे, काळे वगैरे ह्यांचे चार पांच प्रकार आहेत.

फळांशिवाय येथें तराईमध्यें " हाप " नामक फुलाची एक जाति पैदा होते. ह्या फुलांपासून मद्य तयार करण्यांत येतें. त्यामुळें ह्याच्या पिकापासून लोकांस क्रोडो रुपयांची प्राप्ति होते. आजूबाजूच्या प्रदेशांतून प्रतिवर्षीं तीस हजारांपेक्षां जास्त मजूर ' हाप ' वेंचण्याकरितां येथें येतात. त्यांना शेरांच्या हिशेबानें मजुरी मिळते. एक शेर फुलें वेंचणारास एक ते दीड आणा मजुरी मिळते. कोणी कोणी एका दिवसांत साडेतीन मण फुलें वेंचतात. अशा रीतीनें ते दररोज आठ नऊ रुपये मिळवितात. ह्या हंगामांत जपानी लोक तर फारच पैसे कमावतात. परंतु ' हाप ' वेंचण्याचें काम सहा सात आठवडेच चालतें.

### रोजबर्ग

पोर्टल्यॉंडपासून १९८ मैल अंतरावर उंपका तराईमध्यें

रोजबर्ग हें मोठें गांव आहे. याची लोकसंख्या ५५००, डगलस कौन्टीची हें गांव राजधानी आहे. येथें आधुनिक शास्त्रीय उपभोगाचीं सर्व साधनें आहेत. चांगलें पाणी, अग्निसंरक्षक यंत्र, शहरांतील मलिन पदार्थ वाहून नेणारे नळ, चांगल्या पक्या गल्ल्या, विद्युत्प्रकाशित घरें, टेलिफोन वगैरे सर्व कांहीं या साडेपांच हजार वस्तीच्या गांवांत आहेत.

डगलस कौन्टीच्या तराईंत गहूं, ओट, मक्का, अलफा-लफा, बदाम, अक्रोड, सेब, नाशपाती, प्रून, आडू, चेरी, अंजीर, द्राक्षें वगैरे पदार्थ उत्पन्न होतात. ही जमीन चांगली सुपीक आहे. वर्षांत ३५ ईंच पाऊस पडतो. येथील गाईबैल खूप मोठे व तरतरीत असतात. दूध, लोणी वगैरे दुभतें मिळतें. शेतकरी लोक मधमाशा, कोंबड्या, डुकरें, मेंढरें, घोडे वगैरे पाळून त्यांपासून आपला पुष्कळ फायदा करून घेतात.

हिंवाळ्यांत येथें अधिक थंडी पडत नाहीं. कधीं हिम-वर्षाव झाला तरी तो टिकत नाहीं. उन्हाळ्यांत उष्णताही फारशी भासत नाहीं. एकंदरींत बाराही महिने येथील हवा चांगली असते.

---

# आरेगान स्टेट.

ऑरेगॉन संस्थानचें क्षेत्रफळ ९६,००० चौरसमैल आहे. ह्याची लोकसंख्या सुमारें सात लक्ष आहे. याहून ग्रेटब्रिटनचें ह्मणजे इंग्लंड, स्कॉटलंड व वेल्स या तिहींचा

मिळून प्रदेश लहान असून त्याची लोकसंख्या तीन कोटि सत्तर लक्ष आहे, यावरून ऑरेगॉन स्टेट्समध्यें अद्याप किती तरी लोकांची राहण्याची सोय होणार आहे असें उघड उघड दिसतें.

या संस्थानांतील हवा फार उष्ण नाहीं व फारशी सर्दही नाहीं. हिंवाळ्यांत थोडासा हिमपात होतो; परंतु तो टिकत नाहीं. उन्हाळ्यांत ऊन कडक पडतें परंतु रात्रीं हवा मोठी मजेदार असते. ही गोष्ट विशेषत: समुद्रकांठच्या प्रदेशास लागू आहे. समुद्रापासून दूर भूमिप्रदेशांत उष्णता बरीच भासते म्हणून लोक घरांच्या आंत निजतात. इकडे तुफान कधींही होत नाहीं. जमीन फारच सुपीक आहे. या प्रदेशाचें सृष्टिसौंदर्य अतिशय मनोहर व आल्हादकारक आहे. जिकडे पहावें तिकडे रान हिरवेंगार दिसतें. जणुं काय सृष्टिदेवीनें सुरम्य हरितवर्ण शालूच परिधान केला आहे असा भास होतो.

सृष्टीनें ह्या संस्थानांत आपलें कायमचें अधिष्ठान केलें आहे कीं काय असें वाटतें. कारण बर्फानें आच्छादलेले डोंगर, मोठमोठ्या नद्या, डोंगरांतील वेगवान् उच्छृंखल नाले, सुंदर निर्झर व मनोहर कालवे व तलाव यांचें सुंदर दृश्य पाहून प्रेक्षकांचें मन मोहित होऊन जातें. जगांतील सृष्टिसौंदर्याविषयीं प्रसिद्ध अशा प्रदेशांपैकीं ऑरेगॉन स्टेटचा एक प्रदेश आहे असें म्हणण्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं.

ऑरेगॉनच्या पश्चिमभागचा तीनशें मैलांचा प्रदेश उष्ण हवेचा आहे. पॅसिफिक महासागर, आपल्या उष्ण वायु-तरंगांनीं, ह्या भागाला वनस्पतिदृष्ट्या अधिक उपयुक्त बन-वितो. ह्या भागांत मोठमोठीं अरण्यें आहेत. कृषि, दुग्ध-व्यवसाय व फळांची वृद्धि याकरितां हा भाग अत्यंत उपयुक्त आहे.

विलामेटचा प्रदेश सुमारें चार हजार चौरसमैल आहे. ह्याची लोकसंख्या चार लाख आहे. तरी अद्याप येथें पुष्कळच लोकांना वसाहत करण्यास वाव आहे. इतर प्रदेशामध्यें अद्याप फारच थोडी लोकवस्ती झाली आहे. ऑरेगॉन संस्थानांत कमींत कमी दोन कोटि प्राणी आनं-दानें कालक्रमण करूं शकतील. ह्या संस्थानच्या पूर्वभागची जमीन वेगळ्या प्रकारची आहे. पॅसिफिक महासागराचा ह्यावर विशेषसा प्रभाव पडत नाहीं. कैस्केड पर्वतश्रेणीच्या पूर्वेस जी जमीन आहे, ती गव्हाच्या पैदाशीस फारच चांगली आहे. येथें उंच-नीच डोंगर आढळत नाहींत. मोठमोठीं चौरस मैदानें गव्हाच्या शेतीकरितां अत्यंत उप-युक्त आहेत. सूर्यनारायणाचीही ह्या भागावर विशेष कृपा आहे. हिंवाळ्यांत बर्फही पडतें. ह्या भागांतून गहूं, बैल, मेंढरें वगैरे दुसरीकडे विकण्यास पाठविलीं जातात. आतां अलीकडे या भागांत रेलवेचा प्रसार बऱ्याच प्रमाणांत वाढत आहे. तसें झाल्यास रेलवेच्या प्रसारामुळें तेथें पैदा झालेला माल शहरांच्या बाजारांत आणून विकण्यास सोयी-स्कर पडेल व त्यामुळें उत्पन्नही चौपट पांचपट अधिक होईल.

युनायटेडस्टेट्स गव्हर्नमेंटचे विद्वान् प्रोफेसर विथकूम्ब यांचें असें ह्मणणें आहे कीं, ऑरेगॉनची सहा कोटि साडे-पंधरा लाख एकर जमीन लोकांना फारच किफायतशीर आहे. त्यांपैकीं सध्यां चाळीस लाख एकरांपेक्षां कमी जमीन लागवडीस आणली जाते. बाकीची जमीन पडीक स्थितींत पडून राहिली आहे. शेतकीच्या कामास येथील जमीन फारच उत्कृष्ट आहे व विपुलही आहे. जर ही सर्व जमीन लागवडींत आणली गेली तर ऑरेगॉनचें वार्षिक उत्पन्न पन्नास कोटि डॉलर होईल. ऑरेगॉनचे दक्षिण व पूर्व भाग उत्तम प्रकारें लागवडींत आणण्यांत आले तर लक्षा-वधि लोकांना पोसणारें व नंदनवनाप्रमाणें रमविणारें तें त्यांचें स्वर्गधामच बनून जाईल.

तेथील गव्हर्नमेंटजवळ कित्येक हजार एकर जमीन लागवडीस देण्यासारखी शिल्लक आहे. दिवसेंदिवस युरोप व पूर्वअमेरिका या प्रदेशांतील लोक पॅसिफिक कोस्टवर येऊन रहात आहेत. ऑरेगॉनची लोकवस्तीहि वाढत आहे. ऑरेगॉनचे सेब इंग्लंड व स्कॉटलंडमध्यें सुद्धां विकण्यास जातात. जपान व चीन देशांतील लोकही ऑरेगॉनचीं फळें खातात. यावरून येथें भरपूर वसाहती होऊन सर्व प्रदेश लागवडींत येऊं लागला तर येथील फळफळावळ जगांतील सर्व मोठमोठ्या शहरांच्या बाजारांत विक्रीस मांडली जाईल असें अनुमान करण्यास हरकत नाहीं.

फळांशिवाय ह्या संस्थानांत लाकडांची पैदासही पुष्कळ

होते. सुमारें दोन कोटि एकतीस लाख डॉलरांचें लांकूड येथें प्रतिवर्षीं कापून तयार होतें. असें असून चार खर्व फूट लांकूड सध्यां शिल्लक आहे. पोर्टल्यॉंडच्या गिरण्यांत बावीस लाख पन्नास हजार फूट लांकूड दररोज कापण्यांत येतें. जगांतील अन्य कोणत्याही शहरांत इतकें लांकूड कापलें जात नाहीं. ऑरेगॉनमध्यें उत्पन्न झालेला माल जगांतील कोणत्याही बाजारांत तात्काळ खपतो. येथील फर ( देवदार ) वृक्षाचें लांकूड लांबलांबच्या प्रदेशांत विकावयास जातें. फर हें एक मृदु प्रकारचें लांकूड आहे. त्यामुळें तें अल्प सायासानें कांपतां येतें; परंतु जें लांकूड विशेष मजबूत व टणक असतें, तें अमेरिकन गव्हर्नमेंट आपल्या कबज्यांत घेतें. ऑरेगॉन संस्थानांतील कित्येक मोठमोठीं जंगलें त्या सरकारनें आपलें ताब्यांत ठेविलीं आहेत.

ह्या संस्थानांत सोनें, चांदी, तांबें व दगडी कोळसे यांच्या खाणी आहेत. व हा व्यवसाय दिवसेंदिवस वाढत आहे. संस्थानास ह्या व्यवसायापासून प्रतिवर्षीं सुमारें तीस लाख डॉलरांची प्राप्ति होते.

ह्या संस्थानचा माशांचा व्यापार मोठा चालतो. त्यांत कोट्यवधि रुपयांची उलाढाल होते. सुमारें चाळीस लक्ष डॉलरांचे सामन मासे कोलंबिया नदींतून धरले जातात. चिनुक नामक सामन मासे ह्या नदींत फार असतात. ह्या माशांचा तोटा कधींही पडूं नये म्हणून गव्हर्नमेंटकडून विशेष प्रकारचा बंदोबस्त ठेवण्यांत आला आहे. संस्थानांत

माशांचा व्यापार करणाऱ्या मोठमोठ्या कंपन्या आहेत. त्या आपले मासे डब्यांत भरून त्यांवर आपापलीं लेबलें चिकटवून ते डबे परदेशीं रवाना करितात. या कामांत मजूरी वगैरेकारितां सुमारें पंचवीस लक्ष डॉलर प्रतिवर्षीं खर्च होतात. या कामीं एकंदर भांडवल सुमारें पन्नास लक्ष पौंड गुंतलें आहे. अमेरिकन गव्हर्नमेंटनें आपल्यायोग्य व दक्ष व्यवस्थापकांच्या द्वारें ह्या माश्यांच्या वृद्धीचें काम आपले हातीं घेतलें आहे. यावरून संस्थानला हें उत्पन्न नेहमीं—असेंच होत जाणार. असें समजण्यास हरकत नाहीं.

अमेरिकेंत ' हाप्स ' नामक एक प्रकारचीं फुलें पिकतात. त्यांचें उत्पन्न ऑरेगॉनमध्यें फारच मोठ्या प्रमाणावर होतें. त्या फुलांपासून दारू बनविण्यांत येते. सुमारें एक लक्ष वीस हजार गोण्या ' हाप ' येथें दरसाल पिकतो. हें त्याच्या उत्पन्नाचें मान दिवसेंदिवस वाढत असून पुढेंही तें तसेंच वाढत जाणार. कारण या प्रदेशांत त्यांची पैदास चांगलीच यशस्वी होत आहे.

ऑरेगॉनमध्यें मेंढरें पाळण्याचा व्यवसायही दांडगा आहे. सुमारें दोन कोटि पौंड लोंकर त्या मेंढरांपासून पैदा होते. ह्या कामास संस्थानचें हवामानही चांगलें अनुकूल आहे. लोंकरीपासून पक्का माल तयार करणाऱ्या कांहीं गिरण्या तेथें आहेत. लोंकरीचा पक्का माल तयार करण्याच्या कामांत या संस्थानचा हातखंडा आहे. असें त्या व्यवसायांतील तज्ज्ञांचें मत आहे.

ऑरेगॉनच्या पश्चिम भागांत बकरीं विशेष आहेत. त्यांच्यापासून शेतकऱ्यांना मोठाच लाभ होतो. ह्यांच्या केंसापासूनही त्यांना चांगली किफायत होते.

ऑरेगॉनमध्यें स्टेट विश्वविद्यालयाशिवाय दुसरीं कित्येक विश्वविद्यालयें व कॉलेजें आहेत. त्यांत पॅसिफिक विश्वविद्यालय, विलामेट विश्वविद्यालय, कोलंबिया विश्वविद्यालय, बेनिडिक्टन कॉलेज, पॅसिफिक कॉलेज, मेक्मिनव्हिल कॉलेज, अल्बनी कॉलेज व रीड इन्स्टीट्यूट हीं विशेष प्रसिद्ध आहेत. संस्थाननें आपल्या खर्चानें काढलेलें वैज्ञानिक-कृषि कॉलेज कारवालिस येथें आहे. त्यांत कृषि-विषयांचें सांगोपांग ज्ञान दिलें जातें.

ऑरेगॉनची शासनपद्धति सर्व युनायटेडस्टेट्स ऑफ अमेरिकेमध्यें श्रेष्ठप्रतीची आहे. येथेंही लोकसत्ताक राज्यपद्धतीच चालू आहे. येथेंही आस्ट्रेलियन व्होटपद्धति, व्होट देणाऱ्यांच्या रजिस्ट्रीची शैली आणि इनिशियेटिंग ॲन्ड रेफरेंडम, डायरेक्ट प्रायमरी, करप्ट प्राक्टिसेस ॲक्ट व रीकाल हीं आदर्शशासनपद्धतीचीं चार प्रसिद्ध शस्त्रेंही लोकांच्या हातीं आहेत.

पहिली आस्ट्रेलियन व्होट पद्धति:—व्होट देणारास मत देण्याची पूर्ण स्वतंत्रता असते. त्या पद्धतीस हें नांव आहे. या पद्धतीमुळें कोणाची भीड कोणावर पडत नाहीं. बाहेरच्या मनुष्यास कोण मनुष्य कोणास व्होट देतो तें मुळींच कळत नाहीं व एकाद्या लेंच्यापेंच्या मनुष्यावर आपला

प्रभाव पाडण्यास कोणा धूर्त मनुष्यास अवसरही सांपडत नाहीं. हा कायदा इ. स. १८९७ मध्यें पास होऊन ऑरेगॉन संस्थानांत प्रचलित झाला.

दुसरी गोष्ट व्होट-रजिस्टरीच्या संबंधीं आहे. ह्या कायद्यान्वयें प्रत्येक मतदारास व्होट देण्यापूर्वी आपलें नांव रजिस्टर्ड करावें लागतें. निवडणुकीच्या एक महिना पूर्वी व्होट देणाऱ्यांची नोंदणी होते व प्रारंभिक निवडणुकीच्या दहा दिवस पूर्वी नोंदणी करण्याचें काम समाप्त होतें. प्रारंभिक निवडणुकीनंतर चार दिवसांनीं पुन: नोंदणी सुरू होते, व जनरल निवडणुकीपूर्वी वीस दिवसपर्यंत ती तशीच सुरू राहते. व्होट देणारानीं स्वत: रजिस्टरी ऑफिसांत जावें, किंवा एकाद्या माजिस्ट्रेटासमोर रजिस्टरी फॉर्म भरून तो रजिस्टरी ऑफिसांत पाठवून द्यावा. रजिस्टरीच्या पुस्तकांत व्होट देणाराचें पूर्ण नांव, त्याचा रजिस्टर नंबर, रजिस्टरीची तारीख, त्याचा धंदा, वय, जन्मस्थान, अमेरिकन बनल्याची तारीख व त्याचें राहण्याचें ठिकाण हीं लिहिलेलीं असतात, आणि त्याबरोबरच त्याच्या घराचा नंबर, गल्लीचें नांव, घरांची संख्या हींहि नमूद केलेलीं असतात. इतकी सावधगिरी ठेवण्याचें कारण इतकेंच कीं, कोणीहि मनुष्यानें एकाहून अधिक मतें देऊं नयेत. व्होट देतेवेळीं, क्लार्कला व्होटरला व्होटसंबंधीं प्रश्न विचारण्याचा पूर्ण अखत्यार असतो. ह्यामुळें कोणाही लुच्च्या मनुष्यास लुच्चेगिरी करण्यास वाव सांपडत नाहीं. नाहीं तर इ. स. १८९९ पूर्वी एकेक मनुष्य दहा दहा, वीस वीस वेळ भिन्न भिन्न

ठिकाणीं जाऊन व्होट देऊन येत असे, व अशा रीतीनें दुष्ट मनुष्यांच्या निवडणुकीस साह्य करीत असे. याशिवाय मृत मनुष्यांच्या नांवानें व्होट जमविले जात असत. ह्या सर्व लुच्चेगिऱ्यांचा प्रतिकार करण्याकरितां ऑरेगॉनच्या लोकांनीं इ. स. १८९९ मध्यें रजिस्ट्री होण्याचा कायदा पास करून घेतला.

तिसरा कायदा " इनिशियेटिंह्ग ॲन्ड रेफरेंडम " राजनीतिशास्त्रांत अत्यंत महत्त्वाचा आहे. ह्या कायद्यान्वयें कायदे करण्याचा अधिकार प्रतिनिधींच्या पंचायतीस दिला जातो. परंतु जनता कायद्याचे मसूदे पास करणें व त्यांत अवश्य तर सुधारणा करणें हीं कामें आपल्या हातीं ठेवते. शिवाय कायदा मंजूर करणें किंवा रद्द करणें यांत लोकप्रतिनिधि-पंचायताच्या अधिकाराहून अगदीं स्वतंत्र असतात. पंचायताचें कोणतेंही काम स्वीकारणें किंवा फेंटाळून लावणें त्यांच्या मर्जीवर अवलंबून असतें. त्यांच्या अधिकारानें ते मुळींच बांधले जात नाहींत. व्होट देणारांपैकीं शेंकडा आठ लोक एका अर्जावर सह्या करून एकादा विशिष्ट मसूदा पंचायतीपुढें उपस्थित करतील तर पंचायताला जनरल निवडणुकींत तो विषय लोकांसमोर आणावा लागेल. ह्या विधीला ' इनिटियेटिंह्ग ' ह्मणतात. ' रेफरेंडम ' कायद्यान्वयें केवळ शेंकडा पांच व्होट देणारे एका अर्जावर सह्या करून एकाद्या पास झालेल्या कायद्यावर पुनः विचार करण्यास पंचायतीला उद्युक्त करूं शकतात. संस्थानचा गव्हर्नर ह्मणजे केवळ लोकांचा सेवक आहे.

लोकानुमतानें पसार झालेला एकादा कायदा हाणून पाडण्याचा त्याला अधिकार नाहीं.

चौथा " डॉयरेक्ट प्रायमरी " कायदा आहे. ह्याच्या अन्वयें लोक प्रत्येक ऑफिसराची निवडणूक करितात. ज्या भागांत जो ऑफिसर असतो, त्याला तेथील जनता बहुमतानुसारें निवडते. कोणीहि मनुष्य कोणत्याहि उच्चपदाकरितां आपलें नांव लोकांपुढें उपस्थित करूं शकतो. अशा मनुष्यास व्होट देणाऱ्या लोकांपैकीं शेंकडा कांहीं लोकांच्या आपल्या अर्जावर सह्या घ्याव्या लागतात. तात्पर्य काय कीं, कोणीहि मनुष्य कोणत्याहि पदास पात्र असेल तर त्याला तो अधिकार मिळतो व होतकरू, विद्वान् व न्यायप्रिय मनुष्य आपल्या अंगच्या कर्तबगारीवर आपल्या आकांक्षेप्रमाणें कोणतेंहि उच्चपद प्राप्त करून घेऊं शकतो. ह्या कामांत त्याला कोणत्याहि प्रकारच्या पार्टी सिस्टमचा अंगिकार करावा लागत नाहीं. प्रत्येक मनुष्य आपल्या अंगच्या धडाडीप्रमाणें व स्वतःच्या पात्रतेप्रमाणें अगदीं स्वतंत्रतापूर्वक आपल्या देशाची सेवा करूं शकतो.

पांचवा कायदा गव्हर्नमेंटला दोषरहित करितो. त्याच्या अन्वयें उमेदवार मनुष्य आपल्या प्राप्तीचा शेंकडा १५ भाग उच्चपदाच्या प्राप्तीप्रीत्यर्थ खर्च करूं शकतो. या व्यवस्थेमुळें कोणीहि धनिक मनुष्य केवळ आपल्या द्रव्यबळानें पुढें सरसावून व दुसऱ्याच्या अधिकाराची पायमल्ली करून स्वतःच्या पोळीवर तूप ओढण्याचें अन्यायकृत्य करूं शकत नाहीं. संस्थानचा मुख्य प्रधान एक पुस्तक

प्रसिद्ध करितो, त्यांत उमेदवारांच्या योग्यतेचें यथातथ्य वर्णन केलेलें असतें व त्याबरोबरच त्याच्या कांहीं पॉलिसी असतील तर त्यांचेंही विवेचन केलेलें असतें. अशा प्रकारचीं दुसरींहि कांहीं पत्रकें आविर्भूत करण्यांत येतात. त्यामुळें व्होट देणाऱ्या नागरिकांना उमेदवारांच्या पात्रापात्रतेचा विचार करून यथायोग्य निर्णय करण्यास सोयीस्कर पडतें. हीं पत्रकें निवडणुकीच्या पूर्वीं एक महिना निघतात. ह्या सर्व पत्रकांच्या छपाईचा खर्च उमेदवार लोक देतात.

ऑरेगॉनच्या गव्हर्नमेंटनें आपल्या संस्थानाला धूर्त लोकांपासून अगदीं सोंवळें राखण्याकरितां कित्येक प्रतिबंधक नियम पसार केले आहेत. कोणाही लुच्च्या व जहांबाज ठक मनुष्याचा राज्यकारभारांत प्रवेश होऊं नये अशी सर्वसाधारण लोकांचीहि उत्कट इच्छा असते. त्याकरितां मोठमोठे बिकट कायदे पास करण्यांत आले आहेत. आतां शेवटीं आणखी एक गोष्ट वाचकांच्या निदर्शनास आणून ऑरेगॉन शासनपद्धतीचा विषय पुरा करूं. जो मनुष्य जनतेच्या मर्जीप्रमाणें काम करीत नसेल त्याला पदच्युत करण्याचाही नियम त्यांनीं बनविला आहे. त्याप्रमाणें कोणत्याहि जिल्ह्यांतील शेंकडा २५ व्होट देणारे लोक कोणत्याही ऑफिसरास, त्याच्या विरुद्ध अर्ज देऊन, त्या पदावरून च्युत करूं शकतात. ह्या पद्धतीस 'रीकाल' अथवा पदच्युत करणें असें ह्मणतात. त्या अर्जावर व्होट देणारांना आपल्या कार्याच्या पुष्ट्यर्थ योग्य कारणेंही नमूद

[क]रावीं लागतात. त्या अर्जावर ज्याच्या विरुद्ध अर्ज केला गेला असेल त्याचे कांहीं आक्षेप असतील तर ते ऐकून घेतले जातात. त्यांचीं कारणें जर बरोबर असतील तर सर्व व्होटर लोकांसमक्ष दोन्ही पक्षांच्या गाऱ्हाण्यांची भवति न भवति होऊन योग्य निर्णय होतो.

तात्पर्य काय कीं, ऑरेगॉन स्टेटची शासनपद्धति अमेरिकन संस्थानांत सर्वांपेक्षां उत्तम आहे व तेथील लोक आनंदानें आपली कालक्रमणा करीत आहेत.

---

## अमेरिकेंतील वर्तमानपत्रांचें श्रेष्ठत्व.

आपल्या देशांतील वर्तमानपत्रांची अवस्था किती शोचनीय आहे ते वाचकांस महशूरच आहे. त्याला कांहीं कारणेंही विद्यमान आहेत. हिंदुस्थानच्या लोकांतील विद्येचा अल्प प्रसार, उच्च शिक्षणाच्या अभावीं त्यांची बनलेली चारित्र्यहीनता व हजारों वर्षांपासून अंगवळणीं पडलेला आळस व औदासिन्य इत्यादि कारणांमुळें सांप्रत ह्या देशास अशी निकृष्टावस्था प्राप्त झाली आहे. ह्यामुळें आमचे इकडे ज्या सार्वजनिक संस्था स्थापन होतात त्या खद्योताच्या अल्पकालिक तेजाप्रमाणें अल्प काल टिकून शेवटीं नामशेष होतात. प्रारंभीं आमच्यामध्यें अशी स्फूर्ति प्रज्वलित होते कीं, आतां देशाचे दुर्दिन संपून लौकरच तो भाग्यशिखरावर आरूढ होणार असा भास होऊं लागतो; परंतु नंतर कांहीं कालानें शिथिलतादेवी आपल्या भक्तजनांचे कष्ट अधिक न पाहतां त्यांना आत्मसात् करून घेते व "चार दिनकी चांदनी और फिर अंधेरा पाख" ह्या सुप्रसिद्ध हिंदी म्हणीप्रमाणें किंवा 'येरे माझ्या मागल्या' ह्या आमच्या साध्या मराठी म्हणीप्रमाणें वर्तन होऊं लागतें.

प्रसिद्ध करितो, त्यांत उमेदवारांच्या योग्यतेचें यथातथ्य वर्णन केलेलें असतें व त्याबरोबरच त्याच्या कांहीं पॉलिसीय असतील तर त्यांचेंही विवेचन केलेलें असतें. अशा प्रकारचीं दुसरींहि कांहीं पत्रकें आविर्भूत करण्यांत येतात. त्यामुळें व्होट देणाऱ्या नागरिकांना उमेदवारांच्या पात्रापात्रतेचा विचार करून यथायोग्य निर्णय करण्यास सोयीस्कर पडतें. हीं पत्रकें निवडणुकीच्या पूर्वीं एक महिना निघतात. ह्या सर्व पत्रकांच्या छपाईचा खर्च उमेदवार लोक देतात.

ऑरेगॉनच्या गव्हर्नमेंटनें आपल्या संस्थानाला धूर्त लोकांपासून अगदीं सोंवळें राखण्याकरितां कित्येक प्रतिबंधक नियम पसार केले आहेत. कोणाही लुच्च्या व जहांबाज ठक मनुष्याचा राज्यकारभारांत प्रवेश होऊं नये अशी सर्वसाधारण लोकांचीहि उत्कट इच्छा असते. त्याकरितां मोठमोठे बिकट कायदे पास करण्यांत आले आहेत. आतां शेवटीं आणखी एक गोष्ट वाचकांच्या निदर्शनास आणून ऑरेगॉन शासनपद्धतीचा विषय पुरा करूं: जो मनुष्य जनतेच्या मर्जीप्रमाणें काम करीत नसेल त्याला पदच्युत करण्याचाही नियम त्यांनीं बनविला आहे. त्याप्रमाणें कोणत्याहि जिल्ह्यांतील शेंकडा २५ व्होट देणारे लोक कोणत्याही ऑफिसरास, त्याच्या विरुद्ध अर्ज देऊन, त्या पदावरून च्युत करूं शकतात. ह्या पद्धतीस 'रीकाल' अथवा पदच्युत करणें असें ह्मणतात. त्या अर्जावर व्होट देणारांना आपल्या कार्याच्या पुष्ठ्यर्थ योग्य कारणेंही नमूद

रावीं लागतात. त्या अर्जावर ज्याच्या विरुद्ध अर्ज केला गेला असेल त्याचे कांहीं आक्षेप असतील तर ते ऐकून घेतले जातात. त्याचीं कारणें जर बरोबर असतील तर सर्व व्होटर लोकांसमक्ष दोन्ही पक्षांच्या गाऱ्हाण्यांची भवति न भवति होऊन योग्य निर्णय होतो.

तात्पर्य काय कीं, ऑरेगॉन स्टेटची शासनपद्धति अमेरिकन संस्थानांत सर्वांपेक्षां उत्तम आहे व तेथील लोक आनंदानें आपली कालक्रमणा करीत आहेत.

---

# अमेरिकेंतील वर्तमानपत्रांचें श्रेष्ठत्व.

आपल्या देशांतील वर्तमानपत्रांची अवस्था किती शोचनीय आहे ते वाचकांस महशूरच आहे. त्याला कांहीं कारणेंही विद्यमान आहेत. हिंदुस्थानच्या लोकांतील विद्येचा अल्प प्रसार, उच्च शिक्षणाच्या अभावीं त्यांची बनलेली चारित्र्यहीनता व हजारों वर्षांपासून अंगवळणीं पडलेला आळस व औदासिन्य इत्यादि कारणांमुळें सांप्रत ह्या देशास अशी निकृष्टावस्था प्राप्त झाली आहे. ह्यामुळें आमचे इकडे ज्या सार्वजनिक संस्था स्थापन होतात त्या खद्योताच्या अल्पकालिक तेजाप्रमाणें अल्प काल टिकून शेवटीं नामशेष होतात. प्रारंभीं आमच्यामध्यें अशी स्फूर्ति प्रज्वलित होते कीं, आतां देशाचे दुर्दिन संपून लौकरच तो भाग्यशिखरावर आरूढ होणार असा भास होऊं लागतो; परंतु नंतर कांहीं कालानें शिथिलतादेवी आपल्या भक्तजनांचे कष्ट अधिक न पाहतां त्यांना आत्मसात् करून घेते व "चार दिनकी चांदनी और फिर अंधेरा पाख" ह्या सुप्रसिद्ध हिंदी म्हणीप्रमाणें किंवा 'येरे माझ्या मागल्या' ह्या आमच्या साध्या मराठी म्हणीप्रमाणें वर्तन होऊं लागतें.

प्रसिद्ध करितो, त्यांत उमेदवारांच्या योग्यतेचें यथातथ्य वर्णन केलेलें असतें व त्याबरोबरच त्याच्या कांहीं पॉलिसी असतील तर त्यांचेंही विवेचन केलेलें असतें. अशा प्रकारचीं दुसरींहि कांहीं पत्रकें आविर्भूत करण्यांत येतात. त्यामुळें व्होट देणाऱ्या नागरिकांना उमेदवारांच्या पात्रापात्रतेचा विचार करून यथायोग्य निर्णय करण्यास सोयीस्कर पडतें. हीं पत्रकें निवडणुकीच्या पूर्वी एक महिना निघतात. ह्या सर्व पत्रकांच्या छपाईचा खर्च उमेदवार लोक देतात.

ऑरेगॉनच्या गव्हर्नमेंटनें आपल्या संस्थानाला धूर्त लोकांपासून अगदीं सोंवळें राखण्याकरितां कित्येक प्रतिबंधक नियम पसार केले आहेत. कोणाही लुच्च्या व जहांबाज ठक मनुष्याचा राज्यकारभारांत प्रवेश होऊं नये अशी सर्वसाधारण लोकांचीहि उत्कट इच्छा असते. त्याकरितां मोठमोठे बिकट कायदे पास करण्यांत आले आहेत. आतां शेवटीं आणखी एक गोष्ट वाचकांच्या निदर्शनास आणून ऑरेगॉन शासनपद्धतीचा विषय पुरा करूं. जो मनुष्य जनतेच्या मर्जीप्रमाणें काम करीत नसेल त्याला पदच्युत करण्याचाही नियम त्यांनीं बनविला आहे. त्याप्रमाणें कोणत्याहि जिल्ह्यांतील शेंकडा २५ व्होट देणारे लोक कोणत्याही ऑफिसरास, त्याच्या विरुद्ध अर्ज देऊन, त्या पदावरून च्युत करूं शकतात. ह्या पद्धतीस 'रीकाल' अथवा पदच्युत करणें असें ह्मणतात. त्या अर्जावर व्होट देणारांना आपल्या कार्याच्या पुष्ट्यर्थ योग्य कारणेंही नमूद

रावीं लागतात. त्या अर्जावर ज्याच्या विरुद्ध अर्ज केला गेला असेल त्याचे कांहीं आक्षेप असतील तर ते ऐकून घेतले जातात. त्यांचीं कारणें जर बरोबर असतील तर सर्व व्होटर लोकांसमक्ष दोन्ही पक्षांच्या गाऱ्हाण्यांची भवति न भवति होऊन योग्य निर्णय होतो.

तात्पर्य काय कीं, ऑरेगॉन स्टेटची शासनपद्धति अमेरिकन संस्थानांत सर्वांपेक्षां उत्तम आहे व तेथील लोक आनंदानें आपली कालक्रमणा करीत आहेत.

---

# अमेरिकेंतील वर्तमानपत्रांचें श्रेष्ठत्व.

आपल्या देशांतील वर्तमानपत्रांची अवस्था किती शोचनीय आहे ते वाचकांस महशूरच आहे. त्याला कांहीं कारणेंही विद्यमान आहेत. हिंदुस्थानच्या लोकांतील विद्येचा अल्प प्रसार, उच्च शिक्षणाच्या अभावीं त्यांची बनलेली चारित्र्यहीनता व हजारों वर्षांपासून अंगवळणीं पडलेला आळस व औदासिन्य इत्यादि कारणांमुळें सांप्रत ह्या देशास अशी निकृष्टावस्था प्राप्त झाली आहे. ह्यामुळें आमचे इकडे ज्या सार्वजनिक संस्था स्थापन होतात त्या खद्योतांच्या अल्पकालिक तेजाप्रमाणें अल्प काल टिकून शेवटीं नामशेष होतात. प्रारंभीं आमच्यामध्यें अशी स्फूर्ति प्रज्वलित होते कीं, आतां देशाचे दुर्दिन संपून लौकरच तो भाग्यशिखरावर आरूढ होणार असा भास होऊं लागतो; परंतु नंतर कांहीं कालानें शिथिलतादेवी आपल्या भक्तजनांचे कष्ट अधिक न पाहतां त्यांना आत्मसात् करून घेते व "चार दिनकी चांदनी और फिर अंधेरा पाख" ह्या सुप्रसिद्ध हिंदी म्हणीप्रमाणें किंवा 'येरे माझ्या मागल्या' ह्या आमच्या साध्या मराठी म्हणीप्रमाणें वर्तन होऊं लागतें.

आमच्या देशांतील वर्तमानपत्रेंही उपरोक्त जातीय निबं[illegible] तेशीं झगडून, त्यावर विजय प्राप्त करून आपलें अस्तित्व कायम राखण्याचा प्रयत्न करतात; परंतु त्यांना मोठ्या सुदैवानें ह्या भीषण झटापटींत विजयलक्ष्मी माळ घालते. पुष्कळांना निराश होऊन ह्या बाबतींत वैराग्य धारण करावें लागतें. शक्य तितकें सामर्थ्य खर्च करूनही जर ह्या कार्यांत त्यांना यशःप्राप्ति झाली नाहीं तर पुष्कळांच्या कोपाचा पारा इतक्या डिग्रीवर चढतो कीं, ते हिंदी लोक अगदीं नादान आहेत असें ह्मणण्यास मुळींच कचरत नाहींत. कांहीं अंशीं दोन्ही बाजूंकडे दोष असतो; परंतु त्यांत विशेष भाग शिक्षित जनांच्या शिरावरच लादला पाहिजे.

हिंदुस्थानांतील वर्तमानपत्रांपैकीं आपल्या कर्तव्याचें पालन करणारांच्या संख्येची मोजदाद केली तर ती हाताच्या बोटांवर मोजण्याइतकीच भरेल. कित्येक पत्रांना तर आपलें कर्तव्य काय ? याची गंधवार्ताही नसते, व त्यांचा कांहीं विशिष्ट कर्तव्यमार्गही दृग्गोचर होत नाहीं. पुष्कळांना आपल्यावर असलेली मोठी जबाबदारी व आपल्या देशासंबंधीं आपलें कर्तव्य यांचें भानही नसतें. अशा स्थितींत शिक्षितवर्गाच्याच माथ्यावर दोषाचें सारें खापर फोडणें बरोबर दिसत नाहीं. प्रस्तुत प्रकरणांत आह्मीं अमेरिकेंतील वृत्तपत्रांची थोडीशी माहिती वाचकांपुढें मांडणार आहों. तिचें अवलोकन केल्यावर वाचकांना आमच्या उपरोक्त ऊहापोहाच्या सत्यासत्याचा निर्णय करण्यास ठीक पडेल.

अमेरिकेंतील वर्तमानपत्रांचें त्यांच्या देशांत जसें प्रभुत्व आहे तसें अन्य कोणत्याही देशांतील पत्रांचें त्यांच्या देशांत नाहीं हें कोणाहि शिक्षित मनुष्यास कबूल करावें लागेल. तेथील सर्व स्त्री-पुरुष सदोदित वर्तमानपत्रांचें अवलोकन करतात. अत्यंत दरिद्री जरी मनुष्य असला तरी तो निकडींत सवड काढून तत्प्रीत्यर्थ चार पैसे खर्च करतो. तेथें छापखान्यांचा सर्वत्र फैलाव झाला असून त्यानें लोकांच्या विचारास व कर्तव्याच्या ज्ञानाचा प्रसार करण्यास विलक्षण साह्य झालें आहे. तेथील प्रत्येक वर्तमानपत्र ह्मणजे एकेका

राजकीय पक्षाचें मुखपत्र आहे. असा त्यांचा दर्जा आहे. अमेरिकन लोकांचा वर्तमानपत्रांवर फारच विश्वास असतो. ते त्यांचे श्रद्धाळू भक्त आहेत असें ह्मणण्यास प्रत्यवाय नाहीं. याचें खरें कारण ह्मणजे तेथें शिक्षणाचा विशेष फैलाव झाला आहे; हें होय. युरोपांतील बहुतेक देशांमध्यें प्रायः उत्तम व मध्यम श्रेणीचेच पुरुष वृत्तपत्रांचें वाचन ठेवितात; परंतु अमेरिकेंतील सर्व जनता वर्तमानपत्रें वाचण्याची नादी आहे. कांकीं, सामान्य माणसें हींच कोणत्याही देशांतील प्रजेंत विशेष संख्यांक असतात. त्याकरितां हा वर्ग वर्तमानपत्रांचें वाचन ठेवूं लागल्यामुळें अमेरिकेंत वर्तमानपत्रांचें विशेष प्रभुत्त्व पडतें. अमेरिकनांना त्यांचीं वृत्तपत्रें धर्मोपदेशही करतात व त्यांना राजकीय चळवळीचीही बित्तंबातमी सांगतात.

ज्या वर्तमानपत्रामध्यें जगांतील सर्व घडामोडींच्या ज्ञानाचें भांडार ओतप्रोत भरलेलें असेल, त्याला शिक्षणदायक अन्य साधनांपेक्षां विशेष उपयोगी साधन मानण्यास काय हरकत आहे ? अशा पत्रांपुढें व्याख्यानमंदिरें व सार्वजनिक सभा तुच्छ आहेत. पुस्तकांचीहि योग्यता यांच्या बरोबरीस पोहोंचत नाहीं. कारण पुस्तकें हीं वेळोवेळीं थोड्याशा शौकीनांस व सरस्वतीदेवीच्या एकनिष्ट उपासकांसच प्राप्त होतात. परंतु दैनिक पत्रें नेहमीं सर्व लोकांना मिळतात आणि तीं वाचून ते आपले आचार-विचार निश्चित करतात. धर्म, राजनीति व सामाजिक विषय यांचा तत्कालिन जनतेवर अधिक प्रभाव पडतो. कारण अशा अवस्थेंत अधिक परिश्रमावांचून ते आपल्या मताप्रमाणें असणाऱ्या विचारांचें उत्तम प्रकारें मनन करूं शकतात. जगांतील सर्व देशांच्या उन्नतीची त्यांना दररोज माहिती मिळते, निरनिराळ्या देशांच्या मनुष्यांचें निरनिराळ्या विषयांवर काय मत आहे तें त्यांना कळतें व जगांतील सर्व गोष्टींच्या उन्नतीची बातमी कळते. अमेरिकेंतील लक्षावधि मनुष्यें प्रतिदिवशीं दैनिक वर्तमानपत्रांचें वाचन ठेवितात, यावरून तेथे छापखान्यांच्या विलक्षण प्रसारामुळें ज्ञानप्रवाह सर्वत्र कसा खेळत आहे याची थोडीशी कल्पना येईल. पूर्वी वर्तमानपत्रें ह्मणजे

लक्ष्मीपुत्रांच्या टेबलास शोभविणारे पदार्थ किंवा त्यांच्या चैनी[illegible] वस्तूंपैकीं एक वस्तू गणली जात होती, परंतु आतां तो काळ राहिला [illegible] नाहीं. आतां वर्तमानपत्रें ह्मणजे ही एक सार्वजनिक संपत्ति आहे [illegible] अशी भावना दृढमूल झाली आहे, त्यांवर जनतेचा पूर्ण अधिकार आहे. तथापि तीं सर्व जनतेकरितांच प्रकाशित केलीं जातात, आणि याच उद्देशानें त्यांच्या लेखनशैलीचें अनुमान केलें जातें. त्यांत लोकांच्या आवडीच्या विषयांचीच विशेषेंकरून चर्चा व्हावी हें अवश्य आहे. ह्याकरितांच अत्यंत तेजस्वी व चित्ताकर्षक भाषेंत त्यांच्यांत Sensational वृत्तांताचा उल्लेख केला जातो.

प्रत्येक पत्राचे चार उद्देश्य असतात. ( १ ) सामाजिक, राजनैतिक व आर्थिक स्थितीप्रमाणें साधारण योग्यतेच्या वाचकांचे विचार परिपक्व होतील व त्यांचें चारित्र्य सुधारेल असा प्रयत्न करणें. ( २ ) अशिक्षित ( अल्प शिक्षित ) मनुष्यांचें चित्त आकर्षण करून विद्याभ्यासांची त्यांच्यांत आवड वाढविणें. ( ३ ) तरुणांस आदर्शसेवक बनविणें. ( ४ ) राष्ट्रीय घडामोडींत समयानुकूल परिवर्तन करून आपल्या देशाच्या हितांत नेहमीं अग्रगण्य होणें. ह्या सर्व उद्देश्यांकडे विचारपूर्वक पाहिल्यास आपणांस कळून येईल कीं, वर्तमानपत्रांच्या वाचनांत आपण केवळ त्यांत छापलेल्या बातम्यांचेंच मनन करतों; असें नाहीं. तर आपणांस नकळत आपल्या मनावर ह्या पत्रांत मुद्रित असलेल्या हृद्गत विचारांचा पगडा पडत असतो. तसेंच वर्तमानपत्रांचे असे हृद्गतभाव आणि विचार त्यांच्या वाचकांवरच अवलंबून असतात. दुसरी गोष्ट अशी कीं, संपादक जर लायक मनुष्य असेल तर तो अति साधारण पत्राछही अशा फेरफारानें लिहील कीं, सार्वजनिक मतांत व विचारांत त्याच्या खासगी वृत्तीचें अनुमान करणें अगदीं अशक्य होईल. अशा योग्यतेवरच त्या पत्राची कार्यसफलता मुख्यतः अवलंबून असते. अशा योग्य पत्रांच्या लेखनशैलीवरच वाचकवर्ग मुग्ध होतो.

वरील दृष्टीनें अमेरिकेंतील वर्तमानपत्रांकडे पाहिलें असतां तेथील बहुतेक लोकांचा ओढा आपल्या देशांतील राजपद्धति व

रा  य विचार यांकडे विशेषतः असतो; असें आढळून येतें. ह्याक-
रतां तेथील पत्रांमध्यें वरील विषयावरच जास्त मदार ठेविलेली असते. ह्या वर्तमानपत्रांच्या मतानुसारच प्रायः राजकीय परिवर्तन व सभा आणि कौन्सिलें यांच्या सभासदांची निवड हीं घडून येतात.

ही गोष्ट तेथील वृत्तपत्रांच्या दिवसेंदिवस वाढत जाणाऱ्या प्रभुत्वाची द्योतक आहे. तेथील वर्तमानपत्रांनींही सर्वसाधारण लोकांच्या उपकाराकडे दृष्टि देऊन पिण्याचें पाणी व रस्ते यांची स्वच्छता, प्रकाशाची सुव्यवस्था, अनाथांचें पालन, विद्योपार्जनाची सुव्यवस्था, वगैरे गोष्टींचा संतोषजनक बंदोबस्त होण्याकरितां मोठमोठ्या चळवळी केल्या आहेत. म्युनिसिपालट्यांच्या अनियमित निवडणुकी, गरिबांची दुरावस्था, फयाक्टऱ्यांमधील मुलें व स्त्रिया यांची कडक नौकरी, शेतकी व व्यवसाय यांच्या मार्गांतील अडचणी वगैरे गोष्टी बंद करण्यासाठीं ह्या पत्रांनीं विलक्षण परिश्रम केले आहेत. असमर्थांना समर्थांच्या अत्याचारापासून वांचविण्याकरितां, विधवांचें व अनाथांचें पालन करण्याकरितां व भूकंप, अग्नि वगैरे दैविक संकटांनी ग्रासलेल्यांचें दुःख निवारण करण्याकरितां तेथील वर्तमानपत्रें नेहमीं यत्न करतात व त्यांत अत्यंत प्रशंसनीय कर्तबगारी बजावून दाखवितात. हीं पत्रें नेहमींच योग्य पदाधिकारी व सर्व-प्रीय राजपद्धति यांचे तरफदार असतात. व्यापारिक विषयांचीही हीं पत्रें नेते बनलीं आहेत. नानाप्रकारचे संप व वादविवाद यांच्या बिकट प्रश्नांचा या वर्तमानपत्रांतून खल होऊन ते सोडविले जातात.

अमेरिकन पत्रें, आपल्या वाचकांना नानाप्रकारचें शिक्षण देणें हें आपलें मुख्य कर्तव्य समजतात. शिक्षणाचा परिणाम मनुष्याच्या वर्तनावर घडतो. ह्याकरितां आपल्या जनतेला शिक्षित बनविण्याकरितां सर्व राष्ट्रें व समाज यांतील उल्लेखयोग्य अशा गोष्टींचें वर्णन ह्या वृत्तपत्रांतून असतें. तेथील लोकांच्या आचरणावर ह्या वृत्तपत्रांचें अत्यंत वजन पडतें; ह्यामुळें त्या पत्रांच्या संपादकांना

आपल्यावरील जबाबदारीची चांगली जाणीव असते. अमे[illegible] स्वातंत्र्याचें पूर्ण साम्राज्य असल्यामुळें कोणत्याही प्रकारचा राजकीय किंवा सामाजिक भेदभाव विद्यमान नाहीं. प्रत्येक अमेरिकनास सर्वांबरोबर स्वत्व प्राप्त होतें. ह्यामुळें ह्या पत्रांचें एक मुख्य कर्तव्य ह्मणजे प्रजासत्तात्मक विचार व आचार प्रस्थापित करणें हेंच असतें. अस्तु. आधुनिक अमेरिकन वर्तमानपत्रें ह्मणजे सर्वोत्कृष्ट शास्त्रीय माहिती व उपयोगी शिक्षण यांनीं परिपूर्ण अशीं सरस्वतीभांडारेंच असतात.

सार्वजनिक सिद्धान्त दृढ करण्याच्या कामींही वर्तमानपत्रांचा उपयोग होतो. जगांतील निरनिराळ्या देशांचीं व्यावहारिक संबंध उत्पन्न करणें, लोकांचे संकुचित विचार उदात्त बनवून त्यांच्या मनांत अन्य देशीय लोकांविषयीं सहानुभूति उत्पन्न करणें, जगांतील सर्व देशांच्या आचारविचारांचें दिग्दर्शन करणें, त्यांच्या वैय्यक्तिक पक्ष-पाताची इतिश्री करणें वगैरे कामें तेथील वर्तमानपत्रांकडून होतात. अमेरिकन पत्रें ह्मणजे मानासिक सामर्थ्याचीं मूर्तिमंत उदाहरणें आहेत. कारण त्यांच्या योगानें भिन्न भिन्न राष्ट्रांत वैमनस्य किंवा ऐक्य स्थापित होऊं शकतें. जगांतील सर्व सुधारलेल्या राष्ट्रांचीं पार्लमेंटें व मंत्रिमंडळें यांचें लोकांकडून नेहमीं निरीक्षण करवीत राहिल्यानें मोठमोठ्या राज्यकर्त्यांवर या पत्रांचें वजन पडतें व ते नेहमीं आपले विचारकार्यांत परिणित करण्यापूर्वी लोकांवर त्यांचा काय परिणाम होईल. तें यांना विचारतात.

अमेरिकन वर्तमानपत्रांच्या ह्या प्रभुत्वाचें कारण तेथील लोकांची प्रकृति होय. तेथील लोकांच्या मतानुकूलतेनेंच तेथील वर्तमानपत्रांचा जन्म झाला आहे व त्या सर्वसाधारण लोकांच्या मतानुकूलतेनेंच त्यांचें अस्तित्व आजपर्यंत विद्यमान आहे.

॥ समाप्त ॥